## लघुकथांचें

# मानारचें आखात

सौ. इंदिराबाई निफाडकर
श्री. नाथ निफाडकर

महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळ



किंमत आठ आणे

## प्रथम

या पुस्तकाचें सर्वांगसुंदर मुद्रण, काळजीपुरस्सर करून दिल्या
बद्दल **सुदर्शन प्रेसचे मालक, श्री. रामभाऊ गणू**
**देवकर** यांचे मी अंतकरणपूर्वक आभार मानतों.
या दिवसांत मुद्रक, प्रकाशक, व लेखक या
तिघांचे साहचर्य होईल तितकें हवेंच आहे.
या दृष्टीनें **श्री. बाबासाहेब वाड** यांनीं
**श्री. देवकर** यांची मला ओळख
करून दिली, याबद्दल मी
त्यांचेही आभार
मानतों.

---

नाथ निफाडकर

**प्रकाशन दिन**— प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकर्ता जे. जे. रूसो यांचा वाढ-
दिवस २८ जून १९३०

महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळाचें पुस्तक ३



लघुकथांचें

# मानारचें आखात



"I would speed the vast career of civilization"

L. L.





लेखकः— { सौ. इंदिराबाई निफाडकर
रा. एकनाथ यादव निफाडकर



किंमत आठ आणे ] जून १९३० [ द. ह. वेगळे

आज अव्याहत अठरा वर्षें
ज्यांच्या
मैत्रीमुळें माझा आत्मविकास
व
माझी कलावृद्धि होत आहे,

त्या माझ्या प्रिय मित्रास,

**श्री. केशवराव अप्पासाहेब सोनाळकर**

यांनां लघुकथांचें हें

**मानारचें आम्रात**

आम्ही अर्पण करित आहोंत

# अनुक्रमणिका

# आद्यशब्द

रा. एकनाथ यादव निफाडकर व त्यांची पत्नी सौ. इंदिराबाई यांचें लघुकथांचें " **मानारचें आखात** " या नांवाच्या ह्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याला मला फार आनंद वाटतो. नाशिक येथील महाराष्ट्र-वाङ्मय-मंडळामार्फत प्रसिद्ध होणारें हें तिसरें पुस्तक होय. कवि व लेखक या नात्यानें श्री. निफाडकर मराठी वाचकांस इतके परिचित आहेत कीं, त्यांची मी ओळख करून देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे इंग्रजींतील म्हणी प्रमाणें सोन्याला मुलामा देण्यासारखें (Guilding the gold) अनवश्यक आहे. वाङ्मयमंदिरांत त्यांनीं आपल्या ग्रंथांनीं इतकें उच्च स्थान प्राप्त करून घेतलें आहे कीं, माझ्या सारख्या त्या मंदीराच्या बाहेरच्या अंगणांत( outer court ) क्वचित् प्रसंगीं जाणाऱ्या यःकश्चित् मनुष्यानें प्रस्तावना लिहिण्याचें काम स्वीकारण्याचें धाष्टर्य करावें हें चमत्कारिक तर खरेंच; तथापि त्यांची ही कृति मला इतकी आवडली आहे कीं, मी ती वाचकांस सादर करावी ह्या त्यांच्या विनंतीस मान न देणें अशक्य झालें. मी कांहीं वर्षांपूर्वीं ( १९१६–२० ) ' **भारतसेवक** ' नांवांचें मासिक काढीत होतों. तेव्हां श्री. निफाडकर यांचा व माझा प्रथम परिचय झाला. त्यांनीं माझ्या मासिकांत प्रसिद्ध करण्याकरितां अनेक लेख पाठवून मला उपकृत केलें. त्यांचा प्रत्येक लेख उच्च दर्जाचा असे; व त्यामुळें ' **भारतसेवकाच्या** ' लोकप्रियतेंत चांगलीच भर पडली. हें येथें नमूद करण्याला मला फार आनंद वाटतो.

ह्या ' **मानारच्या आखातांत** , सोळा लघुकथा आहेत. आरंभीं प्रस्तावनेदाखल जी हकीगत दिली आहे, तीहि लघुकथेच्याच स्वरूपाची आहे असें म्हटल्यास चुकीचें होणार नाहीं. ही प्रस्तावना चित्ताकर्षक रीतीनें लिहिलेली असून तींत ह्या लघुकथांना " मानारच्या आखाताची " संज्ञा देऊन त्यांच्या स्वरूपाचें जें आविष्करण करण्यांत आलें आहे, तें अगदीं

योग्य आहे. या कथासंग्रहांत श्री. निफाडकर यांची पत्नी सौ. इंदिराबाई यानीं लिहिलेली " दोन बहिणी " या नांवाची एक कथा आहे. ज्या पति-पत्नींत विचारांचें, ध्येयांचें व व्यवसायांचें ऐक्य झालें आहे, तीं दांपत्यें धन्य होत; व असें ऐक्य श्री. निफाडकर व त्यांची पत्नी यांच्या संबंधानें झालेलें पाहून दोघांचें कौतुक व अभिनंदन करावेसें वाटतें; इंग्रजींत मि. सिडने वेब ( आतां ते लॉर्ड पासफील्ड झाले असून सध्यांच्या मंत्री-मंडळांत स्वयंशासित वसाहतींचे सेक्रेटरी आहेत ) व त्यांची पत्नी मिसेस् बियाट्रिस् वेब या दोघांनीं लिहिलेलीं अनेक पुस्तकें आहेत. तीं वाचतांना ' व्यवसायात्मक ' हें दांपत्य किती उदात्त विचारनिष्ठ व सुखी असलें पाहिजे, असे उद्गार काढून मी त्यांचें अत्यंत कौतुक करीत असें; व उपनिषत्कालांतील याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांची मला आठवण होत असे. हिंदुस्थानांत स्त्री-योग्यता व स्त्री-शिक्षण या संबंधानें योग्य विचारांचें जें पुनरुज्जीवन झालें आहे त्यामुळें असला उत्साहकारक व उदात्तत्व प्रेरक प्रचार अधिकाधिक अनुभवास येईल अशी मला फार आशा आहे. असो; ' दोन बहिणी ' ही कथा सुरस व मार्मिक असून ती लिहिल्याबद्दल मी भगिनी सौ. इंदिराबाई यांचें अभिनंदन करितों.

प्रत्येक वाङ्मय सर्वांगसुंदर असलें पाहिजे हें उघड आहे. वाङ्मय हें विश्वासारखें आहे; व ज्याप्रमाणें विश्व हें अनेकरूपी आहे, त्याप्रमाणें वाङ्मयाचीं अनेक अंगें असून प्रत्येक अंग निरोगी, सुदृढ व सुंदर असलें पाहिजे. काव्य, कादंबरी, तत्त्वज्ञान, धर्म, इतिहास, राजकारण, शास्त्र, चरित्र आत्मचरित्र, निबंध, प्रवासवर्णन, गोष्टी इत्यादि वाङ्मयाचीं किती तरी अंगें आहेत; व वाङ्मय असें असलें पाहिजे कीं कोणत्याहि अंगांत कोणत्याहि रीतीनें न्यून आढळून येतां कामा नये. जसें राष्ट्रीय जीवन सर्वव्यापी व सर्वांगसुंदर असलें पाहिजे तसेंच, वाङ्मयही सर्वव्यापी व सर्वांगसुंदर असलें पाहिजे. राष्ट्रीय जीवन व राष्ट्रीय वाङ्मय यांचा अन्योन्यसंबंध फार निकट

असून परस्पर पोषक आहे. राष्ट्रीय जीवन राष्ट्रीय वाङ्मयाला पोषक होतें. राष्ट्रीय ध्येयें, राष्ट्रीय विचार व राष्ट्रीय आकांक्षा वाङ्मयांत व्यक्त होऊन त्या द्वारें समाजांत प्रसृत व दृढ होऊं लागलीं म्हणजे, त्यांच्या प्रसिद्धीचा काल अगदीं समीप आला आहे असें पक्कें समजावें. आपल्या मराठी वाङ्मयाचा गेल्या तीस वर्षांत बराच विकास झाला आहे खरा; परंतु अद्याप तें सर्वांगसुंदर झालें आहे असें म्हणतां येणार नाहीं. वाङ्मयाचीं बरींच अंगें अद्याप अपूर्ण आहेत. उदाहरणार्थ, राजकीय तत्त्वज्ञान, शास्त्र, चरित्र, निबंध इत्यादि वाङ्-मयाच्या भागांत अनेक ग्रंथ लिहिण्यासारखे असूनहि ते लिहिलेले नाहींत; व म्हणून ते भाग अद्याप बाल्यावस्थेंतच आहेत असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. अशी स्थिति कां असावी याची मीमांसा करणें कठीण नाहीं. एकतर निरक्षरता इतकी आहे कीं, वाचकवर्ग एकंदरीनें लहान आहे. शिवाय जीवनकल-हाच्या तीव्रतेनें बहुतेकांना कमी जास्त प्रमाणानें ग्रासून टाकिलें आहे. कोण-त्याही समाजांत नाटकें कादंबऱ्या यांसारखें वाङ्मयच वाचणाऱ्यांचा वर्ग अधिक असतो; व हल्लींचा महाराष्ट्र वाचकवर्ग या नियमाला अपवाद नस-ल्यास नवल नाहीं. परंतु इतर प्रकारचें उच्च स्वरूपाचें वाङ्मय वाचणाऱ्यांचें निदान किमान प्रमाण असावें लागतें; त्याशिवाय असलें वाङ्मय समृद्ध होत नाहीं. व हें किमान प्रमाण साक्षरतेचा बराच प्रसार झाल्याशिवाय अस्तित्वांत येत नाहीं. इत्यादि अनेक कारणांमुळें मराठी वाङ्मयाचीं अनेक अंगें अद्याप अपूर्ण व असमाधानकारक राहिलेलीं आहेत. तथापि अशा प्रतिकूल परिस्थि-तींतही हें न्यून दूर करण्याचे शक्य तितके प्रयत्न झाले पाहिजेत. एक उपाय मला सुचतो; तो असा कीं वाङ्मयउत्तेजक अशा संस्था (Academies) निर्माण होऊन, त्यांनीं उच्च प्रकारच्या विषयांवर पुस्तकें मागवावीं व ज्या ग्रंथकाराचें पुस्तक पहिल्या प्रतीचें ठरेल त्यास चांगलें पारितोषिक द्यावें. अठ-राव्या शतकांत फ्रेंच भाषा जेव्हां फारशी विकसित झाली नव्हती तेव्हां, फ्रान्स देशांत असल्या संस्था अनेक होत्या; व त्यांचा उपयोग फ्रेंच

वाङ्मयांत चांगली भर पडण्याला बराच झाला. प्रसिद्ध तत्ववेत्ता व लेखक रूसो याचा वाङ्मयमंदिरांत प्रथम प्रवेश अशाच द्वारें झाला. डिजन या शहरीं एक वाङ्मयप्रसारक संस्था ( Academy ) होती. तिनें युरोप खंडांत "शास्त्रें व कला यांचें चें पुनरुज्जीवन झालें तें नीतीला पोषक किंवा अपायकारक झालें काय ?" या विषयावरील उत्कृष्ट निबंधास चांगलें बक्षिस देऊं केलें. रूसोनें तें नीतीला आपायकारक झालें अशी बाजू घेऊन आपला निबंध पाठविला. त्यास संस्थेनें बक्षिस दिलें, व जेव्हां तो प्रसिद्ध झाला तेव्हां युरोपखंडांत खळबळ उडून रूसोला आपण एकदम अत्यंत प्रसिद्ध झालों आहों असें आढळून आलें ! दुसऱ्या वर्षी मनुष्यसमाजांतील विषमता कशी उत्पन्न झाली व ती निसर्गधर्मास अनुसरून आहे काय ? ह्या विषयावर वरील संस्थेनें बक्षिस देऊं केलें. रूसोनें पुन्हां निबंध पाठविला; परंतु ह्या खेपेस त्यास बक्षिस मिळालें नाहीं. तथापि, त्यांत व्यक्त केलेल्या विचारांचाहि फ्रेंच समाजावर पुष्कळ परिणाम होऊन अद्यापही त्या निबंधास फ्रेंच वाङ्मयांत बरेंच उच्च प्रकारचें स्थान देण्यांत येतें. असो; नाशिक येथील महाराष्ट्रवाङ्मयमंडळास अशा प्रकारच्या अॅकेडमीचें स्वरूप येऊन, त्याच्या हातून, उत्तम ग्रंथांना पारितोषिक देण्यांत येऊन, तें निर्माण करणाऱ्याला मदत झाल्यास फारच उत्तम होईल, असें जातां जातां लिहिल्यावांचून मला राहवत नाहीं.

लघुकथा हें एक वाङ्मयाचें अंग आहे. व त्याचाहि परिपोष होणें अवश्य आहे. पुस्तकाच्या प्रस्तावनेंत कादंबरी, लघु-कादंबरी व लघुकथा यांच्या, श्री. निफाडकर यांनीं व्याख्या दिल्या आहेत. लघुकथेची त्यांनीं अशी व्याख्या केली आहे कीं, "एकाच गुणदोषांचें द्वंद्व घेऊन, त्यावरच लेखनकौशल्य खर्च केलें तर तिला लघुकथा होण्यास हरकत नाहीं." ही व्याख्या योग्य आहे; तिच्यांत दोष असला तर तो अव्याप्तीचा होय. समाजाला हालवून सोडविणारें एखादें ध्येय किंवा एखादी आकांक्षा लघुकथेच्या द्वारें व्यक्त करण्यास हरकत कोणती ? व ध्येय किंवा तत्व किंवा आकांक्षा अशा रीतीनें व्यक्त करून मांडल्यास त्या कथेस लघुकथा कां ह्मणूं नये?

समाजांतील गुणदोषांचें आविष्करण गोष्टींच्या सहाय्यानें खुबीदार रीतीनें करणं हें वाङ्मयाचें एक उद्दिष्ट आहे यांत शंका नाहीं; परंतु त्या बरोबरच सनातन तत्वें (Eternal verities ,) प्रचलित उदात्त ध्येयें व आकांक्षा हीं व्यक्त करणें हें ही वाङ्मयाचें कार्य आहे. तें करितांना लघुकथांचा अवलंब करण्यास हरकत आहे काय? मला स्वतःला कांहींही हरकत दिसत नाहीं. व म्हणूनच वरील व्याख्येस मी अव्याप्तीची हरकत घेतली आहे. ही माझी हरकत योग्य असो किंवा नसो, व श्री. निफाडकरांनीं केलेली व्याख्या निर्दोष असो किंवा नसो, त्या व्याख्येला धरून मात्र ह्या सर्व लघुकथा आहेत यांत शंका नाहीं. हिंदु-समाजांतील कांहीं प्रचलित गुणदोषांचें आविष्करण त्यांत मोठ्या खुबीदार रीतीनें व मार्मिकतेनें करण्यांत आलें आहे. त्या लघुकथांत नाजूक विनोद (delicate humour ) मधून मधून दिसून येतो; तो उत्तम प्रकारच्या लेखकांनाच साधण्यासारखा असून त्यामुळें लेखांना जी चव (Flavour ) येते ती अवर्णनीय होय, श्री. निफाडकरांची भाषा-शैली सोपी नाहीं ; परंतु ती शुद्ध, प्रौढ व प्रगल्भ आहे. एकंदरीनें ह्या लघुकथा लिहून त्यांनीं मराठी वाङ्मयांत चांगली भर घातली आहे. व त्यामुळें त्यांच्या कीर्तीतही भर पडल्यावांचून राहणार नाहीं. ही कृति वाचक वर्गास ग्राह्य होवो व या लघुकथांची दुसरी आवृत्ती काढण्याचा त्यांनां लवकरच सुप्रसंग येवो अशी आशा व्यक्त करून ही प्रस्तावना (Foreword) मी पुरी करितो.

नाशिक
४ जून १९३०

रा. ग. प्रधान



# दोन अभिप्राय

(१)

हल्लीं मु. नाशिक.

ता. २८-५-३०

रा. नाथ निफाडकरांचे लघुकथांचे पुस्तकावर अभिप्राय देण्याचा माझा अधिकार नहीं हें मी जाणून आहे. रा. निफाडकर यांचे ह्मणण्यावरून या लहानशा पुस्तकाविषयींचें माझें मत व्यक्त करण्याचें मी धाडस केलें आहे.

प्रस्तुत पुस्तकाचा आदि अंत " मानारचें आखात " व " हुकमेहुकुम " या दोन कथानकांनीं करून, त्याच कथानकपात्रांनीं, ग्रंथाची प्रस्तावना व उपसंहार, ग्रंथकर्त्यानें विशेष चातुर्यानें साधला आहे. पुस्तक विशेष आत्मप्रत्ययानें लिहिलें आहे, हें आरंभकथेच्या कथारंभावरूनच दिसतें. अर्थात लेखनकौशल्याविषयीं वाचकांचा व लेखकाचा मतभेद झालाच तर, " तान्प्रति नैष यत्न : " या उक्तीनुसार ग्रंथकर्त्यानें वाचकांनां मोकळीक देऊन, स्वतःची सोडवणूक करून घेतलीच आहे.

"एकाच गुणदोषाचें द्वंद्व घेऊन, त्यावरच लेखनकलेचें कौशल्य खर्च केलें तर तिला लघुकथा ह्मणण्यांत हरकत नाहीं ; " ही ग्रंथकर्त्याची व्याख्या बरोबर किंवा चूक आहे, हें पाहण्याच्या भानगडींत न पडतां, या व्याख्येच्या कसोटीला प्रस्तुत लघुकथा उतरतात किंवा नाहीं, हेंच वाचकांनीं ठरवावें; असा ग्रंथकर्त्याचा आशय दिसतो. " लघुकथांत लेखकाला पसारा मांडतां येत नाहीं ; " ही लघुकथांची, रा. निफाडकरांनीं सांगितलेली खूणगांठ, प्रस्तुत कथामालेंतून उत्कृष्टपणें निदर्शनास येते. व्यक्त भाग थोडा, व अध्याहृत बराच असला तरी व्यक्तापासून अध्याहृताचा बोध लवकरच होतो. वाङ्मयसेवकांचें माहात्म्य सिद्ध करण्याकरतां, कांहीं गोष्टी आहेत तर कांहींमधून सामाजिक प्रश्नांची प्रच्छन्न चर्चा आहे. कांहींतून वास्त-

विक तर कांहींतून काल्पनिक समाजचित्रें रेखाटलीं आहेत. राजकारणाला लेखणी शिवली नाहीं असें म्हणतां येत नाहीं. निरनिराळ्या परिस्थितींत वाढलेल्या सहोदर व्यक्तींचें स्वभावांत परिस्थितीच्या परिणामामुळें कसा फरक पडतो, याचें चित्र फारच थोडक्यांत, " दोन वहिणी " या, सौ. इंदिराबाई निफाडकर यानीं लिहिलेल्या कथेंत आहे. " स्त्रीच तारते व स्त्रीच मारते " या कथेचा प्रसंग जितका स्वाभाविक दिसतो, तितकाच " अखेर विस्तवानें जाळलेंच ? " यांतील प्रसंग हिंदु समाजांत अस्वाभाविक वाटतो. दोन्ही कथानकांचा विषय एकाच जातीचा. बऱ्याच गोष्टींतून स्वत्व प्रकट केलेलें दिसतें. " भुतांबरोबर चहापान " हें या बाबतींत एक उत्कृष्ट उदाहरण आहे. लघुकथांची ग्रंथकर्त्यानें दिलेली व्याख्या तितकी स्पष्टपणें पुस्तकांत नमूद केली नसती तर बरें झालें असतें. ' गुणदोषांचें द्वंद्व ' नसून देखील " जलचरांची सभा " मार्मिक आहे . भाषा सुटसुटीत आहे. 'माझा आनंद खिडकींत मावेना ' अशा तऱ्हेचे कांहीं भाषाप्रचार त्या त्या संदर्भांत विशेष खुलावट व मनोरम वाटतात. मात्र कचित्स्थलीं भाषेला नागमोडी वळणें आहेत. ' आपल्या आतुरतेला दिरंगाईची धार पाजण्याचा माझा मुळीच विचार नाहीं ; ' हें याचें उदाहरण होय.

' स्वतंत्र वृत्तीचा ' सामान्य वाचक या नात्यानेंच मी आपलें वरील मत व्यक्त केलें आहे. वास्तविक रा. नाथ निफाडकर यांच्या लेखनशैलीबद्दल माझ्यासारख्या अव्यासंगी वाचकाच्या साक्षीची गरज नाहीं.

नारायण प्रल्हाद हिरूरकर



श्रीकृष्णबाग

एलिचपूर कँम्प, वऱ्हाड

१ जून १९३०

" मानारचें आखात " ह्या आपल्या लघुकथांच्या पुस्तकांत श्री. निफाडकर यांनीं सोळा लघुकथांचा अन्तर्भाव केला आहे. थोडक्यांत पुष्कळ अर्थ, पुष्कळ कथानक, व खोल भावना व्यक्त करण्याची एक फार सुंदर पण

फार कठिण अशी लेखनपद्धति आहे ; तींत लिहिण्याचें ध्येय, श्री. निफाडकरांनीं आपल्यासमोर ठेविलेलें आहे. पण आपण कांहींही अथवा कसेंही लिहिलें तरी, तें त्या पद्धतींतील लेखनाचा उत्तम नमुना म्हणून वठणारच अशासारखी जी भावना, श्री. निफाडकरांनीं मनाशीं धरून या गोष्टी लिहिलेल्या दिसतात, तसें जर त्यांनीं केलें नसतें, तर खचित त्यांना ही लेखनपद्धति अधिक साधली असती. तसेंच, अहंकाराचा जो एक तीव्र भाव, श्री. निफाडकरांच्या बहुतक लेखनाप्रमाणेंच त्यांनीं याही आपल्या गोष्टींत व्यक्त होऊं दिला आहे, तो मनाला आल्हादजनक वाटत नाहीं. पहिल्याच गोष्टींत त्यांनीं स्वतःचेंच केलेलें गुणदोषविवेचन बरोबर किंवा पूर्ण आहे असेंही ह्मणतां येत नाहीं. ज्या पद्धतीनें लिहिण्याचा श्री. निफाडकरांचा यत्न आहे, त्याचा एक चांगला मासला, त्यांच्या कुटुंबाची एक गोष्ट, ह्याच पुस्तकांत दिली आहे तींत पान ३७ वर सातव्या ओळीपासून सोळाव्या ओळीपर्यंत आहे. श्रीयुत निफाडकरांच्या ह्या संग्रहांतील गोष्टींपैकीं, "मजवरि धरला त्रिभुवनिंचा;" "केशवसुतांची तारा;" "पत्ता लावणाऱ्यास साम्राज्य बक्षीस ;" या गोष्टी विशेष चांगल्या साधल्या आहेत. "भुतांबरोबर चहापान" ही हि गोष्ट छान आहे ; पण तिचा शेवट साधल्यासारखा वाटत नाहीं. "जलचरांची सभा ;" ही देखील गोष्ट चांगली चित्तवेधक झाली आहे ; पण तिचें शेवटीं तात्पर्य काय, कांहींच कळत नाहीं. या सर्व संग्रहांत सर्वांत उत्तम विनोदी लेखन "नारदापेक्षां वाल्मीकिच श्रेष्ठ !" या गोष्टींत साधलें आहे. "स्त्रीच तारते व स्त्रीच मारते" ही गोष्ट रंगविण्यास त्या कथानकांत मुबलक जागा असून ती रंगविली जावी तशी मुळींच रंगविली गेली नाहीं; "तें दृश्य कोणतें ?" ही गोष्ट बहुतक सर्वच दृष्टींनीं विशेष सदोष आहे. "हुकमेहुकूम" या गोष्टींतील, मधला अफाट कल्पनांचा व त्यांच्या तात्पर्याचा भाग चांगला आहे ; पण त्या गोष्टींतील "हुकमेहुकूम" या शद्बाचा प्रयोग जो, "जो हुकूम" अशा अर्थी केलेला दिसतो तो मात्र बरोबर नाहीं ; व त्या गोष्टींत उपर्युक्त कांहीं इतर दोषही वाटतात.

व. ग. खापर्डे
कविभूषण; मराठीचे प्रोफेसर सेंट्रल हिंदु-कॉलेज, हिंदु-विश्व-विद्यालय, काशी; सर-चिटणीस, विदर्भसाहित्यसंघ.

# आभार

पुस्तकप्रकाशनाच्या अगोदर, ज्यांच्या विचारस्वातंत्र्याविषयीं व बुद्धि-प्राविण्यतेबद्दल मला अत्यंत आदर वाटतो, अशा तिघांचे अभिप्राय मागवावे असें मला वाटलें; व त्यांपैकीं रा रा. रामचंद्र गणेश प्रधान बी ए. एलेल् बी एम् एल् सी. यांनां या पुस्तकाला एक Foreword ( आद्यशब्द ) लिहिण्याची विनंती करावी ; असेंही मी ठरविलें. तिघांचीं मतें परस्परांनां न कळविण्याचीही मी सांगून सवरून खबरदारी घेतली होती. हेतु हा कीं प्रत्येकाचा अभिप्राय निखालस स्वतंत्र असावा. माझा हेतु अपेक्षेपेक्षांही जास्त सफल झाला. त्या तिघांच्याही अभिप्रायांत मला शिकण्यासारखें असें पुष्कळच आढळलें. श्री नारायण प्रल्हाद हिरूरकर एम्. ए. एलेल्. बी; व कविभूषण प्रो. बळवंत गणेश ऊर्फ अण्णासाहेब खापर्डे हे दोघेही, आज विदर्भसाहित्यसंघासारखी प्रतिष्ठित व कार्यकारी साहित्यसंस्था चालवित आहेत ; अण्णासाहेब तर त्या संस्थेचे जनकच आहेत. तेव्हां वाङ्मय लेखक त्याचप्रमाणें वाङ्मयोत्तेजक अशा दुहेरी नात्यांनीं त्यांनीं मजकरितां आपापलीं बहुमोल कामें बाजूस सारून आमच्या या सामान्य लघुकथांविषयीं आपापलें मत प्रांज्जलपणें व्यक्त केलें, याबद्दल मी त्यांचे जाहीर आभार मानतों. प्रधानसाहेबांचा आद्यशब्द किती उच्च दर्जाचा आहे हें मी अनधिकारी माणसानें सांगणें उचित नाहीं. परंतु मी स्वानुभवानें खचित सांगतो कीं, श्री. रा. ब. दादासाहेब पाध्ये व श्री. रा. ग. प्रधान यांच्या प्रदीर्घ व्यासंगाची मला जसजशी जास्त माहिती मिळू लागली, तसतसा माझा त्यांच्याविषयीं आदरभावही वाढू लागला; आणि त्यांच्या मानानें आह्मीं, ( निदान मीं तरी, ) अगदींच किरकोळ आहोंत हेंही मला स्पष्ट दिसूं लागलें. यापेक्षां जास्त कशाला ?

नाथ निफाडकर

# मानाखें आखात



आमच्या महाराष्ट्रवाङ्मय मंडळाच्या कचेरींत आम्ही कांहीं मित्र, आज सायंकाळपासून बसलों होतों. चार सुशिक्षित लोक एकत्र बसले म्हणजे त्यांच्या भाषणांत प्रचलित राजकारण, प्रचलित नाटकें, हवापाणी, स्थानिक घडामोडी, प्रसंगीं भूताखेतांच्या वादविवादांवरून प्रत्यक्षानुभवाच्या ( तरी पण तिखटमीठ लावून रसभरित केलेल्या ) गोष्टी, वगैरे नानाप्रकारचे विषय निघायचेच. तसे आमच्या आजच्या बैठकींत निघालेच. पण आज लघुकथांवर जास्तच कडाक्याचा वाद झाला. त्यांत गोपाळराव मला म्हणाले;

" निफाडकर ! ही तुमची टीका ठीक आहे. पण एकदां लघुकथांचें पुस्तक प्रसिद्ध करून तर पहा ; म्हणजे समजेल. "

" जणों, निफाडकरांच्या लघुकथा प्रसिद्ध झाल्याच नाहींत ! " विश्वनाथपंत म्हणाले.

" अहो, एकत्र अशा आजपर्यंत कुठें आल्या आहेत ? कादंबऱ्या, व लघुकादंबऱ्या म्हणजे लघुकथा नव्हत. निफाडकर, हे खरेंना ?"

" कबूल आहे"मी म्हटलें; "ज्या कथेंत समाजाच्या अनेक गुणदोषांचें आविष्करण होतें तिला कादंबरी म्हणतां येईल. एकापेक्षां जास्त पण अगदीं मुख्य तेवढ्याच गुणदोषांचें आविष्करण झालें तर त्या कथेला लघुकादंबरीचें रूप येईल; आणि एकाच गुणदोषांचें द्वंद्व घेऊन, त्यावरच लेखनकलेचें कौशल्य खर्च केलें तर तिला लघुकथा म्हणण्यास हरकत नाहीं. या व्याख्या मीच ठरवल्या आहेत हां ! पाश्चात्यांचे चांगले प्रकारही मी आमच्या समाजाला पोषक होतील, अशाच पद्धतीनें स्वीकारतों. लघुकथांची लांबी-रुंदी, विषय, विचारपद्धति, भाषाशैली, भावनाप्राबल्य यांत नियम घालतां

येणार नाहींत. मात्र लघुकथांत लेखकाला पसारा मांडतां येत नाहीं —

" खांबोश." गोपाळरावांनीं मला हटकून म्हटलें; "हीं व्याख्यानें आतां पुरें. मूळ मुद्दा असा कीं, आपल्या लघुकथा छापवा कसें !"

" गोपाळराव ! माझ्या लघुकथांची वही हरवली हो !"

" सोनाळकरांचे स्नेही ! त्यांचें " कमला " महाकाव्य हरवलें, तशी यांची लघुकथांची वहीच हरवली. "

" हरवली खरी बुवा ! " मी खिन्न मुखानें कांहींसें उत्तरादाखल बोललों; पण तें उद्गारच खरे ! मी पुढें म्हटलें ; "पूर्वींची माणसें मडक्यांतून धन लपवून ठेवित, तेंच बरें होतें. एखादी गोष्ट ट्रंकेत, एखादी तिजोरींत, एखादी कपाटांत, एखादी गोपाळरावांच्याजवळ, एखादी—

" संपादकाजवळ, एखादी छपरावर, एखादी वाऱ्यावर, एखादी देवळांत, एखादी मसणवटींत, एखादी आगगाडींत—

टॅप! टॅप! टॅप!

" यस् ! कमिन् !" गोपाळरावांनीं दाराबाहेरच्या माणसास परवानगी दिली. दार उघडलें. व आंत एक स्त्री व एक छोटा मुलगा अशीं दोघें आलीं. आम्हीं सगळ्यांनीं उठून त्या स्त्रीचें स्वागत केलें; व मी तिला आपली खुर्ची देऊन खिडकींत बसलों. तिनें त्या मुलाला पुढें धरून म्हटलें ;

" मला अकल्पित रीतीनें आलेली पाहून आपणांला आश्चर्य वाटलें असेल. पण माझें काम तसेंच जरूरीचें आहे. माझें नांव मिस् सिताबाई साळुंके. तें असो ह्मणा. मि. निफाडकर ! आपलें जर मी एक काम केलें तर आपण मला काय बक्षीस द्याल ? "

" आपण मागाल तें. पण आपण माझें कोणतें काम करणार आहां ?

" या घ्या आपल्या लघुकथा !" तिनें एक मोठें पाकीट माझ्याजवळ दिलें. माझा आनंद खिडकींत मावेना, म्हणून मी ताडकन उठून पाकिट

फोडून त्यांतले कागद टेबलावर पसरण्यास खोलींत आलों. पण तीं हस्तलिखितें पाहतांच माझी निराशा झाली.

" या गोष्टी माझ्या नाहींत "मी विवळून म्हटलें.

" अगबाई! मग कोणाच्या ? मला वाटलें,- आपल्याच असतील. पहा पहा बरें नीट निरखून! सगळे कागद पहा! "

" छे " मी तें पुडकें चाळित चाळित म्हटलें. शेवटीं त्या कागदांची नीट घडी करून मी ती सीताबाईंना देऊं लागलों ; तोंच-लेखिका-मिस् सीता-बाई साळुंके- ही ओळ मला दिसली. ती पाहून, मी कांहींसें हसून, कांहींसें चिडून, पण पुष्कळसें निराशेनें तिला म्हटलें; "ह्या गोष्टी तर आप-ल्याच आहेत. "

" हो. त्या आपण वाचाव्या अशी माझी आपणांस विनंती आहे. आपणां जवळ मी बक्षिस मागणार होतें तें हेंच. "

" पण आपण फुकटच बक्षिस मागत नाहीं कां ?

" असें कसें होईल? मला इतकें कां कळत नाहीं? मी आपली परीक्षा केली"

" परीक्षा! "

" क्षमा करा! पण पुष्कळ लेखक असा बेवारसी माल आपलाच म्हणून बेलाशक छापतात. "

" चांगली परीक्षा घेतलीत! "मी हळहळून म्हटलें.

" मी आपली फिरून क्षमा मागतें; व या आपल्या लघुकथा आपणांस देतें-- पण थांबा! गोष्टीशिवाय आपलीं आणखीं कांहीं लिखितें गहाळ झालींत कां?"

" मी सांगतों. " गोपाळराव म्हणाले ; " निफाडकरांचा गडकऱ्यांच्या नाट कांवरील निबंध रणगर्जनेच्या संपादकांनीं एक तृतीयांश छापला व दोन तृतीयांश हरवला असें ते म्हणतात. मुंबईच्या आणखी कांहीं संपादकांजवळ त्यांच्या कांहीं गोष्टी व निबंध आहेत. बेळगांवच्या एका दोघां संपादकांनीं त्यांचे कांहीं लेख दाबले आहेत —

" सीताबाई!" मी मध्येंच त्रासून उद्गारलों; " या पंचायती तुम्हांला कशाला हव्यात? तुमच्याजवळ माझ्या लघुकथा असतीलतर द्या; नसल्यास नाहीं म्हणा!"

" अगबाई! रबर बरेंच ताणलें म्हणायचें. घ्या या लघुकथा ! "

" थँक्यू! थँक्यू हार्टिलि ! " मी माझी वही चटकन् ओळखली. तींत माझ्या एकूण एक गोष्टी आहेत, असें पाहून मला अत्यानंद होणें स्वाभाविक होतें. तेवढा आनंद ओसरल्यावर मला एक शंका आली. मी तिला विचारलें;

" ही वही तुम्हांला कोठें सांपडली ? "

" आगगाडींत. "

" ओ यस्! आतां आलें ध्यानांत? बरें पण, या गोष्टी माझ्याच हे तुम्हांला कसें समजलें ? या वहीवर माझें नांव गांव कांहींच नाहीं. "

" जणों गोष्टी बोलतच नाहींत ! आपली लेखनशैली, विचारपद्धति, भावनाविष्करण, निसर्गवर्णन, शास्त्रीय मीमांसेची आवड, पण सर्वांत मुख्य व अचूक गुण म्हणजे मनःस्वातंत्र्य, आपणांस छपवितां येणार नाहीं."

" गोपाळराव! " विश्वनाथपंत म्हणाले, " लघुकथा छापण्याच्या अगोदरच त्यांवर अभिप्राय घ्या."

" बरोबर आहे! " गोपाळराव म्हणाले, " सीताबाईंना अजून बक्षिस मिळावयाचें आहे!"

" मि. निफाडकर ! " सीताबाईंनीं गोपाळरावांकडे दुर्लक्ष करून म्हटलें; " आपल्या गुणांप्रमाणें आपले दोषही उमटून पडतात. आपली भाषापद्धति कड्यांकड्यांवरून वाहणाऱ्या पावसाळ्यांतल्या ओहोळासारखी असते. सामान्य वाचक भांबावून जातो. सूचकता हा गुण सामान्यांना ग्रहण करतां येत नाहीं. त्यांना एकूणएक दुवा दिसलाच पाहिजे. वास्तविक लघुकथांत आटोपशीरपणाशिवाय चालत नाहीं. पण आपण एका वाक्यांत दहा वाक्यांचा सार आणतां. आपली विचारांची गति भयंकर तीव्र असते. तिच्यापुढें लेखनगतीचा टिकाव लागत नाहीं. शिवाय, आपली कांहीं विधानें भारी

तापदायक असतात. थोडक्यांत सांगणें झाल्यास आपल्या लघुकथांना मी " **मानारचें आखात** " म्हणेन."

" मानारचें आखात! " मी उद्गारलों; " ब्यूटी ! सीताबाई ! मी आपला अत्यंत अत्यंत आभारी आहे. या लघुकथांनां मी नांव शोधतां, व काल्पितां दमलों. आपल्या तोंडून हें नांव सहजगत्या—

" नॉन्सेन्स ! " तीही उद्गारली;" मी ती संज्ञा विचारपूर्वक देत आहे. "

" ठीक आहे ! " मी म्हटलें " मोत्याबरोबर गाळही येतो, असें तुमचें म्हणणें ना ! "

" मोत्यें थोडीं; गाळच पुष्कळ ! " गोपाळरावांनीं चिमटा घेतला.

" एका यःकश्चित् मोत्याची किंमत टोपलीभर गाळापेक्षां किती तरी जास्त असते; " विश्वनाथपंतानीं माझी बाजू घेतली.

" तुह्मीं सगळेच चुकतां! पुरुष आहांत झालें! "

" ह्मणजे ? " आह्मी सगळेजण एकदम ओरडलों.

" असें ओरडूं नका! ओरडूनही पुरुषी उथळपणा सिद्ध करतां! माझें म्हणणें असें कीं, मानारच्या आखातांत, अगर पर्शियन आखातांत बुडी मारून भाडस केल्याशिवाय जशीं मोत्यीं मिळत नाहींत, तसेंच निफाडकरांचे दो[illegible] पत्करल्यावांचून त्यांचे गुण कळावयाचे नाहींत. "

" तें कांहींही असो!" मीं तडफेनें ह्मटलें; "गुणदोषविवेचन करणें हें टीका-कारांचें काम आहे; आणि त्यांच्या टीकेलाही तोच निकष लावणें हें ग्रंथ-कर्त्यांचें आत्महितार्थ कार्य आहे. मला आपली "**मानारच्या आखाताची**" संज्ञा पसंत पडली ती एवढ्याकरतां कीं, माझें हें पुस्तक सागरासारखें विशाल नाहीं, साधें आखातासारखें मर्यादित आहे. सागर भूमीला वेष्टितो, पण आखात प्रेमानें भूमींत शिरतें. समाजसागराला शिकवण्याचा या लघुकथांत माझा हेतु नाहीं. माझी तितकी पात्रता नाहीं. समाजआखाता-पासून मी काय व कसा शिकतों, याची ही ओळख आहे. ओळख देतांनां कांहीं माणसांनां रीतभातीची हस्तीदंती साधत नाहीं. मलाही

साधत नाहीं हें मी कबूल करतों. आतां मानारचेंच आखात मला का आवडलें, तर या लघुकथांत एक, “ **जलचरांची सभा** ” नांवांची कथा रामेश्वराची आहे ; व ती मला भारी आवडते. रामेश्वर ‘मानार’ आखाताच्या अगदीं कांठीं नसलें तरी बरेंच जवळ आहे. कसेंही असो. सीताबाई, मी आपला आज अनेक प्रकारें आभारी आहे. ”

“ अहो ! आभारी काय ? उतराई झालें पाहिजे उतराई ! ” ती हसली.

“ कबूल ! सीताबाई आपणच सांगा कीं, मी आपला कसा उतराई होंऊं?”

“ या आपल्या भेटीचीच गोष्ट लिहून, ती प्रस्तावनेदाखल प्रथम छापून काढाल काय ? ”

“ सीताबाई ! आपण खरोखर रसिक आहांत ! **रा. ब. दादासाहेब पाध्ये,** यांनीं या लघुकथा वाचून, मला ज्या बहुमोल सूचना केल्या, त्यामुळें ह्या लघुकथांच्या मानारच्या आखातांत बुडी मारणाराला थोडीं तरी मोत्यें सांपडतील, अशी मला जशी खात्री वाटते, तसाच, केवळ आपल्या या लघुकथांविषयक मजवर झालेल्या उपकारांचा प्रकार होणार आहे. आतां अशा गोष्टीमुळें प्रकाशनाच्या अगोदरच इतरांचें अभिप्राय जाहीर होतात खरें. पण वाचक स्वतंत्र वृत्तीचे असतात, असेंच मी धरून चालतों. ”

“ पण माझ्या गोष्टी वाचणार ना ?

“ आनंदानें ! त्या तर खचित मोत्यांच्या ओंजळीच असतील. ”

“ माझ्या गोष्टी मोत्यांच्या ओंजळी आहेत किनई, हें आपणच पहावें. पण **मानारच्या आखातांतून** एक रत्न तर खचित मिळालें आहे. आपल्या इंदिराबाईंच्या “ **दोन बहिणी** ” मला खरोखरच आवडल्या. ”

“ स्रीजात तितकी सारी—

“ भारी लबाड ! लुच्ची !! लफंगी !!! ” सीताबाईंनीं माझें वाक्य माझ्याच सुरांत पुरें केलें. सारी कचेरी हशानें दुमदुमून गेली.

# बौद्धिक विवाह



" यावें यावें ! आपलें मी स्वागत करतों. मला मराठी भाषा येत नसल्यानें, आपल्या कवित्वाची मुळींच कल्पना नाहीं. पण आपण खचित नामांकित कवि असाल; त्याशिवाय इतक्या दूरवर मला मुद्दाम भेटण्यास आलांच नसतां. "

" मला आपली गुजराथी भाषा साधारण कळते; पण त्या भाषेत मला बोलतां येत नाहीं. आपण इंग्रजींत बोलूं या. "

" कविराजांनां इंग्रजी तर अगदीं अपरिचित आहे;" सुरसबाईंनीं मला मराठींतच सांगितलें. पण तें सांगतांना त्यांनां थोडेंसें वाईट वाटत होतें खरें. " तथापि मी आपणां दोघांची दुभाष होईन. आपण आमच्या कविराजांची कीर्ति ऐकून——

" क्षमा करा! मी वाङ्मयासंबंधीं बोलण्यास इतक्या लांबवर, मुद्दाम पैसे खर्च करून आलों नाहीं. नरोत्तमदास कवि आहेत, हें मला प्रवासांत काल समजलें——

" मग आपणांला अत्यंत वाईट वाटलें असेल. " नरोत्तमदासांनीं मला आढ्यतेनें अडविलें. ( दुभाषानें आपलें काम उत्तम चालविलें होतें. शिवाय कविराजही फार हुशार असल्यामुळें, माझ्या चेहऱ्यावरून व एकंदर बोलण्याच्या झोंकावरून, त्यांनीं माझ्या बोलण्याचें मर्म चटकन् ओळखावें हेंही खरेंच. )

" वाईट वाटण्यापेक्षां चांगलेंच वाटलें कीं.वाटलें कीं, आपलें काम फत्तेहोणार!"

" आपलें काम तरी काय आहे ? तें ऐकण्याची आमची आतां तीव्र जिज्ञासा आहे. " सुरसबाईंनीं म्हटलें.

" आपल्या आतुरतेला दिरंगाईची धार पाजण्याचा माझा मुळींच विचार

नाहीं " मी महाराष्ट्रीय कवीला शोभेलशा ऐटदार बेपर्वाईनें उत्तर दिलें. " पण अगोदर आपण आपल्या आजोबांनां शांत राहण्याची विनंती करावी. माझें काम त्यांनां मुळींच रुचणार नाहीं. "

पण आजोबापेक्षां नातीचाच चेहरा एकदम पडला. आजोबांनींही तें ओळखलें व मला ह्मटलें :—

" दुसऱ्यांनां त्रासवण्याकरितां महाराष्ट्रीय कवि मुद्दाम पैसा खर्च करतात काय ?"

" आह्मीं महाराष्ट्रीय गांधींनांही फंड देतों. तें असो ह्मणा. आपण माझें काम तर ओळखलेंच. आणि मला वाटतें कीं, मीदेखील थोडीशी चूकच केली. याच त्या सुरसबाई असतील, हें मला कसें कळणार ? सुरसबाई ! आपण मला क्षमा करावी. माझा आपणांस दुखवण्याचा मुळींच हेतु नव्हता. तथापि, झालें तेंही बरें झालें. वर्तमानपत्रांतल्या बातम्या किती अपुऱ्या असतात, याचें प्रत्यंतर आलें "

" अपुऱ्या ! अहो खोडसाळपणाच्या असतात. !! " कविराजांनीं संतापानें म्हटलें.

" आपल्या याबतींत तसा अनुभव घेण्याची माझी मनापासून इच्छा आहे. एकतर अगदीं खरें आहे कीं, सुरसबाईनीं आपली निवड स्वतःच केलेली दिसते. त्या वयानें तर मोठ्या आहेतच ; पण बुद्धीनेंही मोठ्या दिसतात."

" या ग्रॅज्युएट आहेत. "

" अरे वा ! मग, या मलाही ज्ञानवृद्ध आहेत. इंग्रजी भाषेचें भरपूर ज्ञान असणें, हेंच जर ज्ञानाचे गमक धरलें तर, आपल्या या आजीबाई सहज शोभतील. यांनां मराठीही येतें. संस्कृत भाषेचें यांचें अध्ययन असेलच. ( यावेळीं मी माझ्याजवळच्या टेबलावरचें मोलियरचें पुस्तक सहजगत्या उघडलें. ) Very good ! सुरसबाई आपण फ्रेंच भाषेतही प्रविण दिसतां मी आपलें अभिनंदन करतों. "

" Many thanks! पण इतक्या भाषा ज्ञानानें सुद्धां कविराजाच्या

भक्तींचा एक कणही माझ्या वांटेला आला नाहीं." सुरसबाई विवळून ह्मणाल्या. "आपणांस गुजराथी भाषा येत नाहीं. नाहींतर मी आपणांस यांच्या उत्तमोत्तम कविता म्हणून दाखवल्या असत्या."

"मी एका अपूर्व काव्यप्रतिभेला मुकलों याचें मला आतां अत्यंत वाईट वाटत आहे. पण मला गुजराथी भाषेची गोडी मिळणार नसली तरी, कविराजांचा काव्यसंदेश तर कळेल ना?"

"काव्यसंदेश!" सुरसबाईनीं चकित होऊन ह्मटलें. त्यांचें अंग लटलट कांपूं लागलें. थोड्या वेळांत त्या शांत झाल्या व ह्मणाल्या,

"काव्याला आनंदाशिवाय दुसरा कोणता संदेश असणार?"

"कविराज काय ह्मणतात?"

"मी कविता रचतों, त्यावेळीं मुळींच भानावर नसतों. माझी कविता माझी नसून, ती परमेश्वर माझ्या मुखांतून वदवतो. त्याचा संदेश त्याल माहित; मला काय विचारतां?"

"आपलें असें म्हणणें आहे कीं काय कीं, काव्यस्फूर्ति आणि अफूपान एकच?"

"दोहोंचे परिणाम वेगळे असल्यानें दोन्हीं एकच कशीं असतील?

"काव्याचा परिणाम कोणता?"

"आनंद."

"तर मग आनंद हा काव्याचा परिणाम आहे; संदेश नव्हे"

"कविराज," सुरसबाईनीं नरोत्तमदासांनां ह्मटलें कीं, "संदेश व आनंद एकच नाहींत कां?"

"अर्थात्!" कविराजानें उत्तर दिलें. सुरसबाई मजकडे पाहूं लागल्या-

"संदेश दुःखाचाहि असूं शकेल. आमच्या शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेचा संदेश, औरंगजेबाच्या तख्ताला, बॉम्बपेक्षांही भयंकर वाटत होता."

"पण स्वतः त्यांनां तो आनंददायीच होता ना?"

"ते अफजलखानाच्या कवळींत होते, त्यावेळीं त्यानींच आपल्या प्रभाचे

छान उत्तर दिलें असतें. मला वाटतें कीं संदेश वेगळा, निष्ठा वेगळी व आनंदही वेगळाच होय. माझी स्वानुभवाची वाणी आहे कीं, संदेश हा केव्हांहि दुःखदायकच असतो. गर्भिणीच्या प्रसूतीच्या क्लेशानें त्याच्या दुःखांची थोडीशी कल्पना येईल. पूर्वीची घडी विघडलेली असते : ती इतकी कीं, तिचा नाशच करणें जरूरीचें असतें ; नाशानेंच नवी घडी बसणें शक्य असतें ; अशा वेळीं, यज्ञाला बलिदान म्हणून, परमेश्वर सत्कवीला संदेश देऊन जगांत संदेशगीत गात गात, मारला जाण्याकरतां पाठवितो. ''

" तर मग कालिदास कवि नव्हेच ? "

" तो कवि नाहीं असें मी कधींच म्हणणार नाहीं. पण तो एकंदरीनें पिंजऱ्यांतला पोपटच खरा! "

" गटेनें शाकुंतल डोक्यावर घेतलें होतें. " मुरसबाई म्हणाल्या.

" त्यांत गटेची थोरवी आहे. शाकुंतलाची नाहीं. त्याचें हृदय दुःखा तिशयानें विदीर्ण झालें व शाकुंतलानें त्याला आराम वाटला एवढेंच. त्यावेळीं जर गटे कवि नसता, व कपाळदुखीनें त्रासलेला श्रीमंत असता, तर त्याला ओरिएंटल बाम नेंच आराम वाटला असता : नाहीं कां ? "

" कमाल आहे बाई, तुमची ! आपणांस शेक्सपिअर फार आवडत असेल ? "

" कालिदास पुष्कळ चांगला ; पण शेक्सपिअर नको. कालिदास पोपट असला तरी त्याचें गाणें पौराणीक व औपनिषदिक स्वातंत्र्याचें आहे. उलट शेक्सपिअरचीं नाटकें व काव्यें कितीही आत्मप्रत्ययी असलीं अथवा बहिश्चोदनेची असलीं, तरी त्याचें हृदय लांडग्याचें होतें! त्याचा काळच लांडगे-शाहीचा होता ; आणि भुकेलेले लांडगे कितीही पराक्रमी असले तरी संकोचित् दृष्टि त्यांनां कदापि सोडित नाहीं. शिवाय शेक्सपिअरलाही मी स्वातंत्र्याची (Originality) किंमत देत नाहीं. तो स्वतःच कबूलकरतो कीं,

So all my best is dressing old words new
Spending again what is already spent.

" मग आपल्या दृष्टीनें सर्वोत्कृष्ट कवि कोण ? "

"ऋग्वेदकालीन ऋषि, त्यांतल्या त्यांत गौतम कण्व व अंगीरस. अगदीं विखारी अशा जंतूपासून तों थेट मस्त लोकांपर्यंत त्यांच्या अनुभवजन्य व ईश्वरी संदेशयुक्त स्फूर्तीचा प्रान्त, नेत्रांसमोर उभा राहतो. मानवी मनाच्या आविष्करणाची त्यांनीं पराकाष्ठा केली आहे. ते ऋषी मानवी पराक्रमाच्या संदेशापायीं तपश्चर्येनें जळत आहेत. इंग्लंडमध्यें मिल्टन व शेले आणि फ्लॉरेन्समध्यें डेन्टे यांना त्या ऋषींच्या मार्गाचे कवि समजतां येईल. अलीकडे बर्नर्ड शॉ व आमचे कांहीं महाराष्ट्रीय कवि तसे संदेशप्रेरित आहेत. "

" समजलें ! सगळें ध्यानांत आलें !" सुरसबाई म्हणाल्या ;
" मि. निफाडकर ! I thank you heartily !!"

× × ×

आठ दिवसांत मला सुरसबाईंचें एक लहानसें पत्र आलें.

प्रियबंधु नाथ निफाडकर,

सा. न. वि. वि. आप्तेष्टांच्या मनाविरुद्ध मी वृद्ध अशा नरोत्तमदासाशीं लग्न लावण्यास तयार झालें होतें; याला कारण केवळ त्यांच्या कवित्वावर मी भुललें होतें. आमचें बौद्धिक लग्न होणार होतें. पण बुद्धीला सीमा नसते हें आपण मला दाखवलें. म्हणून आमचा विवाह विचार मी आतां सोडून दिला आहे.

आपली कृतज्ञ भगिनी
**सुरसबाई दिवाटिया**



# सत्यमेव जयते।



" आतां × × × गांवच्या गजाननराव चापटांचें प्रकरण. " डिस्ट्रिक्ट लोकल स्कूल बोर्डाचे ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर मि. कुशाभाऊ ज्योतिर्षी म्हणाले.

" त्यांना तावडतोब बडतर्फ करा कसे ! " मि. गागले तडकाफडकी उद्गारले.

" अहो पण प्रकरण ऐकून घ्याल किनई ! " कुशाभाऊ हसत म्हणाले.

" त्यांत आतां नवीन काय ऐकायचें आहे ? " गागल्यांचे स्नेही गायकवाड यांनीं खुर्चीवर आपली—खुर्चीची नव्हे-- पाठ ताठ करून विचारिलें;"चापट प्रकरण सर्व जिल्ह्यांत गाजलें आहे. "

" मला त्यांतला एक शब्दही माहित नाहीं. " केशवराव जोश्यांनीं शांतपणें सांगितलें.

" नसायचाच. " गायकवाडांनीं केशवरावांकडे कुत्सित बुद्धीनें पाहून फूत्कार टाकला. " आजकाल केशवरावांनां अज्ञान फार आवडूं लागलें आहे. "

" ज्ञानवंतांच्या सभेंत अज्ञानच बरें. " केशवरावांनीं उलट चिमटा घेतला. ते म्हणाले " कुशाभाऊ ! तुह्मी तें प्रकरण वाचा बघूं ! "

" केवढें आहे ? " प्रेसिडेंट, मि. सदासावध यांनीं विचारलें.

" एकंदर पंचवीस शीट्स् आहेत. "

" पंचवीस शीट्स् ! विसुभाऊ दांडेकरांची गोष्टच म्हणायची! "

" पण काल्पनिक गोष्टींपेक्षांही ही जास्त मनोरंजक आहे ! " कुशाभाऊंनीं सांगितलें.

" मी अशा बोलण्याला हरकत घेतों ! " मि. गागले ओरडले. " अगोदर ॲड ऑफिसरला जास्त बोलण्याचा अधिकार नाहीं. त्यांत माहिती देतांना सभासदांचें मन कलुषित करण्यासारखा त्यांनीं एक शब्दसुद्धां काढूं नये.

मि. ज्योतिषी, हें प्रकरण बनावट आहे असें तुमचें म्हणणे आहे कीं काय ? ''
" या प्रश्नाचें उत्तर देण्याचा मला येथें अधिकार नाहीं. ''

बरेच सभासद हसले. गागले मात्र चिडले.

" मि. ज्योतिषी, '' प्रेसिडेंटांनीं गांभीरपणानें विचारलें " हेडमास्तरांचा रिपोर्ट केवढा आहे. ?
" आठ शीट्स् कम सात ओळी ! '' — सभासद हसले.
" काय ह्मणावें या हेडमास्तरांनां ? '' प्रेसिडेंटांनीं सभासदांचें हंसणें थंडावल्यावर ह्मटलें. " त्यांनां वाटतें कीं, आपण जणों वर्तमानपत्रांचीं बातमीपत्रेंच लिहित आहोंत ? ''

सभासद मोठ्यानें हसणार होते. पण इतक्यांत सुंदरराव सावंतांनी प्रेसिडेंटला टोला मारला;
" जणों बातमीपत्रें लिहिणें सोपेंच असतें ! ''
सुंदररावांचा फुसका वार झाला हें सर्वांना पटलें. तरीही प्रेसिडेंटांनीं त्यांनां ह्मटलेंच; " हा प्रश्न सोप्याचा नाहीं; लांबी रुंदीचा आहे. ''

सभासदांनीं हसून डोक्यावर हॉल घेतला ! सुंदरराव विरघळले. तरीही नेहमींच्या संवयींप्रमाणें त्यांनीं, शेवटीं बोलूनच जय मिळतो, ही आपली भावना पुरी करण्याकरतां विचारलें; "आपण कधीं बातमीपत्रें लिहिलीं कां ? ''

त्या बावळटाच्या लक्षांत लांबी रुंदीची खोंच आली नाहीं हें मात्र सर्वांच्या लक्षांत आलें; पण त्यांनीं सुंदररावांची कींवच केली. थोड्या वेळानें प्रेसिडेंटांनीं सदर शाळेचे हेडमास्तर व प्रकरणाचे नायक रा. बापट यांचे रिपोर्ट व जबाब, साक्षी वगैरेंचा सारांश सांगण्यास मि. ज्योतिषी यांना फर्माविलें.

" प्रकरण फार साधें आहे. '' ए. ओ. म्हणाले. " बापट सदर शाळेचे

फर्स्ट असिस्टंट आहेत; व मि. सापळे हे हेडमास्तर आहेत. दोघेही फुल ट्रेंड टीचर्स आहेत. पण बापट वयानें सापळयांपेक्षां तेरा वर्षांनीं मोठे आहेत. बापटांना पेन्शन घेण्यास आतां सहाच महिने उरले आहेत."

"हा सारांश नव्हे." गायकवाडांनीं हरकत घेतली.

"अरेबियन नाइट्स् नाहींत ना? कुशाभाऊ, चालू द्या पुढें."

"बापट व सापळे यांत विशेष सख्य नाहीं. बापट कर्मठ ब्राह्मण आहेत. ते अस्पृश्यांच्या मुलांना पाण्याच्या माठाला शिवूं देत नाहींत. पण स्वतः त्यांना लागेल तितकें पाणी घालतात."

"मुख्य अपराधाला हात घाला." मि. गागले ओरडून म्हणाले. त्यांना ओरडण्याच्या अमोलिक गुणावरच सभासदत्व मिळालें होतें असा सार्वत्रिक समज होता. समजच तो!

"बापटांना अस्पृश्यांच्या मुलांचा तिटकारा नाहीं. त्यांच्या वर्गांतले सगळे अस्पृश्य विद्यार्थी दरसाल व्ह. फा. मध्यें पास होतात; व गुदस्त सालापासून अस्पृश्य विद्यार्थ्यांचाच पहिला नंबर असतो; व तो हटकून बापटांचाच विद्यार्थी असतो. एकदां असें झालें कीं, यंदाचा पहिला पास्ड विद्यार्थी बापटांच्या घरीं गेला; व त्यानें आपली बहीण सून करून घ्यावी, अशी बापटांना विनंती केली. वधूवरांचें परस्परांवर प्रेम आहे असें त्यानें वधूवरांकडूनच बापटांना पटवून दिलें! त्याचा परिणाम असा झाला कीं बापटांनीं आपल्या मुलग्याला घरां तून हकलून दिलें; व त्या दिवसापासून ते अंत्यजांना दुसऱ्या मुलांकडून पाणी देवूं लागले. झालें! प्रकरण हें असें आहे!"

"यांत हेडमास्तरांची तक्रार कोणती आहे?"

"तक्रारी अनेक आहेत. प्रथम, बापटांनीं रागाच्या भरांत त्या अंत्यजाच्या विद्यार्थ्याला व त्याच्या बहिणीला काठीनें मारलें; अशी तक्रार आहे."

"ती तक्रार आमच्यांकडे कशाला? ही कांहीं पोलीस चावडी नाहीं. मुलानें बापटांवर फिर्याद दाखल केली काय?"

" नाहीं. "

" पण तो करणार आहे. " गायकवाड ह्मणाले.

" आणि जरी केली नाहीं, तरी आपल्या विद्यार्थ्याला व त्याच्या बहिणीला अशा केस पिकलेल्या मास्तरनें मारणें चांगलें का ? " सुंदररावांनीं सुचवलें.

" वाईट ! खरोखरच वाईट ! " सदासावध ह्मणाले. " पण तो विद्यार्थी काय ह्मणतो ? "

" विद्यार्थ्याची साक्ष आह्मांला घेण्याचा कोणता अधिकार ? तो कांहीं आतां शाळेत नाहीं; व प्रकारही शाळेच्या आवारांत घडला नाहीं. "

" हेंही पण साफ खोटें आहे ! " गायकवाड म्हणाले. " बापट शाळेंतल्या वर्गांत, तुळशी खुर्डांत असतांना त्यांनीं नारायणाला व शान्तेला मारलें. "

" नारायण ! शान्ता !! नांवें कांहीं अस्पृश्यांचीं नाहींत ! " केशवराव जोशी उद्गारले.

" ह्मणजे नांवांतसुद्धां त्या गरीबांनीं ब्राह्मणांप्रमाणें राहूं नये कां ? "

" गायकवाड ! तुम्ही भारी भावनाप्रधान आहांत बुवा ! प्रथम कोणतींच नांवें केवळ ब्राम्हणांचीं नाहींत. आणि नांवांतच कशाला, प्रत्येक बाबतींत सर्वांनीं ब्राम्हणांच्या पुढेंदेखील जावें कीं. "

" मला वाटतें, हें विषयांतर होत आहे; " सदासावधांनीं इशारत दिली.

" कुशाभाऊ ! तुम्ही नारायणाला भेटलां होतां काय ? "

" आपली परवानगी असेल तर मी त्याला आत्तां इथें आणतों. तो बाहेरच उभा आहे. " सुंदरराव म्हणाले.

अध्यक्षांनीं परवानगी दिली. नारायण आला. क्षणभर तो गोंधळला. पण लवकरच त्याला उमेद आली. त्याला सर्व खरा प्रकार सांगण्याची सूचना झाल्यावर तो हात जोडून म्हणाला;

" अध्यक्ष महाराज, आज आपण मला हृदय मोकळें करून बोलूं देतां, याबद्दल मला आपलें जन्मभर ऋणीच राहिलें पाहिजे. गेल्या महिन्या दोन

महिन्यांत माझ्या छातीवर कसें दडपण बसलें होतें. ( त्याच्या डोळ्यांत अश्रु आले. ) बाबासाहेबांनीं—
" बाबासाहेब कोण ? "
" बापटमास्तर. त्यांनीं मला खरोखरच पोटच्या पोराप्रमाणें वाढवलें. त्यांच्या विरुद्ध हें काहूर माजवलें आहे. नुसतें काहूर आहे; बघा ! "

मि. गागल्यांचें तोंड खरकन् उतरलें; गायकवाड जळफळूं लागले; व सुंदरराव वेड्यासारखे सगळयांकडे पाहूं लागले.
" मुला, तुला व तुझ्या बहिणीला बापटांनीं मारलें काय ? "
" ते आम्हांला मारतील ही कल्पनासुद्धां मला करवत नाहीं. त्यांनीं मला मारलें तर नाहींच; पण उलट आपल्या आचरणानें असा कित्ता दिला कीं कालच्या प्रकारानें तर मोठ्या शहाण्याचेंही डोकें फिरलें असतें; पण मी मात्र शांतपणें विचार करित असून, मला बाबासाहेबांच्या कृपेनें संकटांतून मार्गही सांपडेल. "
" कसलें संकट ? कसला प्रकार ? "
" मी येथें निर्भय आहे कां ? "
" कां ? असें कां विचारतोस ? तुला कोणाचें कसलें भय वाटतें?"
" मला मरणाचें भय वाटतें. "
" मरणाचें ? तुला इथें कोण मारणार ?"
" सापळे हेडमास्तर ! मी व शान्ता त्यांचींच मुलें आहोंत ! !"

सगळी सभा आश्चर्यस्तिमित झाली !
" हीं पत्रें पहा ! या जिनसा पहा ! हे फोटो पहा ! या नोटांचे नंबर सापळयांच्या या डायरींतल्या नोटांशीं ताडून पहा ! ! हे पैसे त्यांनीं माझ्या आईला दिले होते. मी व शान्ता चार दिवसांपूर्वीं आमच्या झोपडीची जमीन खणत असतां, आम्हांला एका ट्रंकेंत हें सगळें सांपडलें. हें पाहून व वाचून आम्हीं फार घाबरलों; व कशाही संकटांत बाबासाहेबच आम्हांला

तारतात, म्हणून त्यांचा सल्ला घेतली, ”

“ मग त्यांनीं कोणती सल्ला दिली. ”

“ ते म्हणाले कीं, तुम्हीं दोघें खूप शिका ; व ब्रम्हचारी राहून अध्यायन अध्यापनाचें पवित्र कार्य करा. दामोदरपंतांनींही तसेंच ठरविलें आहे. ”

“ दामोदरपंत ?”

“ मास्तरांचे चिरंजीव. त्यांनीं मला स्पष्टच सांगितलें कीं, वडलांच्या हयातींत आपण लग्न करणार नाहीं. पण नंतर मात्र शान्तेची तयारी असेल तर मी तिच्याशींच लग्न लावीन. तिनें नाकारलें तर मात्र आमरण ब्रह्मचर्य! ”

“ त्यांनां सापळप्रकरण माहित आहे काय?”

“ होय ! शान्तेनेंच स्वत: सांगितलें; तेव्हां ते म्हणाले कीं, सद्विद्येनें व सद्गुणराशीनें रक्ताचे दोषही जळून भस्म होतात .”

“ Bravo! ” गायकवाड आनंदानें ओरडले;गायकवाड महार नसले तरी त्यांनां अस्पृश्योद्धाराची तळमळ लागलेली होती. “ मि. प्रेसिडेन्ट, मी आतां सर्वांसमक्ष शपथ घेऊन सांगतों कीं, यापुढें मी ब्राह्मणांचा द्वेष कधींही करणार नाहीं ; व उलट आमचा जे कोणी द्वेष करतील त्यांचीही मी सद्वर्तनानें मति पालटवून देईन !! ”

“ आम्हींही पण ! ” सर्व ब्राम्हणेत्तर सभासद उठून शपथपूर्वक म्हणाले.

“ तुम्ही आम्हां ब्राम्हणांनां लाजवलें !” प्रेसिडेन्टांसहसर्व ब्राम्हण उत्तरले.



# अखेर विस्तवानें जाळलेंच !



" तूं बालविधवा असतीस तर फार चांगलें झालें असतें ! " बळवंतराव बोडस, प्रोबेशनर सब् इन्स्पेक्टर, आपल्या नुकत्याच लग्न करून आणलेल्या पत्नीला, प्रेमाच्या भरांत ह्मणाले. प्रेमाच्या भरांत ह्मणजे, तिची चिंचोळी हनु मृदुपणें हलवून. तीं दोघें स्प्रिंगच्या पलंगावर आडवीं झालीं होतीं. दारास चिकाचा तरी पडदा हवा, इतका आडपडदा ठेवण्याची अर्थातच, त्यांनां जरूर वाटली नाहीं. पडदा—सिस्टीमच्या विरुद्ध ण्याच्याही पलीकडली त्यांची पिढी होती. आतां दारालगत एक कॉन्स्टेबल होता, ही गोष्ट वेगळी. तसा दारांत एक बुल्डॉग, व पलंगाखालीं एक टेरियर हीं होतीं. तें फौजदारसाहेबांचें वैभव होतें.

" इश्श ग बाई ! ही काय घाणेरडी कल्पना आपणांला आठवली ! " पत्नीनें चिंचोळी हनु पतीच्या हातांतून सुटल कीं काय, याची थोडीमुद्धां क्षिति न बाळगतां आपली मान मुरडून ह्मटलें.

" इश्श करायला काय झालें ? हें बघ, तुझ्याठायीं जयंताच्या लीलेचे सगळे सद्गुण आहेत. तूं गोरी, देखणी, तरुण, कामल व हुशार, शिकलेली आहेस. तुझें नांवही लीला आहे. फक्त बालविधवा नाहींस. "

" बालविधवा असतें तर काय झालें असतें ? "

" माझ्या प्रेमाला पराक्रमाचें तेज आलें असतें. "

" ह्मणजे तरुणांनां स्वार्थत्यागाचा प्रौढी गाजवायला मिळावी म्हणून कुमारिकांनीं बालविधवा व्हावें कीं काय ? "

" अग स्वार्थत्याग कसला घेऊन बसलीस ? उलट आपला स्वार्थ चांगलाच साधला असें वाटण्याकरतां वैधव्याची फार जरूरी असते. दुसऱ्याचा माल—

" माल ! " लीलेनें नाक फेंदारून उद्गार काढला !

" माल शब्दानें इतकें कांहीं दचकायला नको ! अग ! प्रेम हीसुद्धां देव-

सेवेची वस्तुच असते. शरीराची गोष्टच नको. "

आपण विस्तवाजवळ आलों असें लीलेला आतां वाटूं लागलें. स्त्री-जात कितीही धीट झाली तरी, पुरुषांनासुद्धां कांहीं कल्पनांच्या जादूपासून दूर होतां येत नाहीं; तर स्त्रियांची गोष्ट कशाला ? आपला नवरा नुसत्या नाटकांचीं सोंगेंच घेतो, अशी तिची लग्नापासूनच्या तीन महिन्यांत समजूत होती. पण सुंदर बालविधवांनां तर हा चटावलेला नाहीं ना ? अशी एक कल्पना तिच्या त्या सुंदर व सुकुमार डोक्यांत चमकली; व त्या कल्पनेला ती लता बळी पडलीच. तिनें तसें पतीला विचारलेंच. त्याच्या उत्तरा-वर तिचें संसारसौभाग्य टांगून राहिलें.

" मला अशी बालविधवा लाभती तर तुझ्याविषयीं माझी तशी भावना झाली असती काय ? "

तिच्या सौभाग्याची निदान विषारी आग तरी, या उत्तरानें थंडावली. या पुढें एखादी बालविधवा मिळाली तर आपण मला सोडाल का ? या प्रश्ना-चा प्रयोग करण्याचें त्या बालिकेला धाडसच झालें नाहीं. एका कल्पनेनेंच ती हरिणी हैराण झाली !

वरील गोष्टीला आठ दहा दिवस होऊन गेले. फौजदारसाहेब एका खुनाच्या खटल्याबाबत रानोमाळ हिंडत होते. त्यांच्या गैरहजेरींत एक दिवस एक बालविधवा लीलेकडे आली; व म्हणाली; " आपली प्रत्यक्ष ओळख नसतां आपणांकडे आलें, याची क्षमा करावी; पण- हे पत्र वाचावें. "

पत्र कांहीं तसें वावगें नव्हतें. पण त्याचा लीलेला उलगडा होईना.

" हें पत्र आपणांकडे कसें आलें ? "

" हें कांहीं पहिलेंच नाहीं. "

लीलेचा चेहरा सुकूं लागला. तिनें विचारलें; " स्पष्टच विचारतें; क्षमा करा. आपला व इकडला संबंध असल्याचें मला माहित नाहीं. "

" ती माझी चूक नाहीं. "

" पण संबंध तरी कोणता आहे ? "

" आपण परस्परपोषक आहोंत. "

" मला नाहीं अजून समजलें. "

" आपणां दोघांमिळून त्यांची एक लीला होते. "

लीला झांबून पडली. तिचा उणेपणा पूर्णपणें झांकून टाकणारी ती दुसरी लीला लगेंच निघून गेली.

नंतरच्या दोन दिवसांत, लीलेच्या डोक्यांत भावनांचें जें काहूर माजलें त्यांच्याशीं आपणांला कांहीं कर्तव्य नाहीं. पण एवढें खरें कीं, फौजदार जेव्हां घरीं परत आले, तेव्हां मध्यरात्र होती; व त्यांच्या बंगल्यांतून विशेष ऐटबाज अशी रोषनाई केलेली त्यांनां दुरूनच दिसली. त्यांनां अर्थातच सखेद आश्चर्य वाटलें ; व त्यांनीं तांगा तेथेंच थांबवून टायगरला, ——टेरियर लीलेजवळच होती——स्वस्थ असण्याची खूण करून मंद पाव-लांनीं घर गांठिलें. माडीची तावदानें बंद होतीं. पण त्यांच्यावर दोन माणसांच्या छाया हालचाल करित होत्या. हालचाली कांहीं संशयाला पोषक नव्हत्या. पण——

" माझ्या लाडक्या ! "

" माझी मैना ! मेरी प्यारी !! "

" कोण तो ! कॉन्स्टेबल !! चपराशी !!! "

बळवंतरावांना वाटलें कीं, आपण वरील उद्गार खूप मोठ्यानें काढले : पण त्यांनां संशयानें इतकें भाजलें होतें कीं, त्यांच्या ओठांची सुद्धां परस्पर भेट होईना !

" माय बॉय् ! माय लव्हर !! "

" माय डिअर ककू !"

एका क्षणांत फौजदार तांग्याजवळ शंभर यार्डांवर परतला; व तेथून त्यानें बरोबर नेम धरून बंदुक झाडली ! नेम फारच थोडा चुकला.

लीलेचें कपाळा ऐवजीं मानेचें हाड मोडलें. फौजदार धांवत बंगल्यांत गेला; तों लीला बरळत होती:—

" गणू, त्यांनां सारें समजाऊन सांग. " तिच्याकडून बोलवेना.

" काय गणू! काय ह्मणते ही ? "

" काय सांगू साहेब! कपाळ माझें !! अशी साध्वी गमाऊन बसलांत !! "

" अरे काय झालें तरी काय ; सांग लवकर !"

" आपण त्या बाल विधवेला पत्र लिहिलें; व तें तिनें यांनां दाखवून सगळें सांगितलें. तेव्हां तसें स्त्रियांनांही वागता येईल असें आपणांस, माझ्या मदतीनें खोटेंच भासवून आपणांस या पापापासून परावृत्त करणार होत्या. "

" ह्मणजे, हें सगळें नाटकच कां होतें ? "

" महाराज ! नाटकांनींच घात केला बरें !"

" आणि सिनेमानें ; " लीला मरतां मरतां ह्मणाली. " मी सिनेमा पाहिला नसता तर ही युक्ति मला सुचलीच नसती. प्राणनाथ......मी..... क्ष......मला...मां...डी...ग्रा. "

बळवंतरावांनीं मांडी तर दिलीच. पण नाटकांतल्या लीलेमागें जयंतानें प्रेमसंन्यास घेतला कीं, फिरून दुसऱ्या लीलेच्या पाशांत तो सांपडला; अशी बळवंतरावांना जबरदस्त शंका येत असे. आणि आपण प्रेमसंन्यास न घेतांही, दुसऱ्या लीलेशीं नाटकी संसार केला. अशा सगळ्याच नाटकी कल्पनांनीं त्रासून गेलेल्या त्या फौजदारानें, तीच बंदूक आपल्या कपाळावर ठेवून गोळी-बार केला ! सिनेमांतल्या ॲक्शनप्रमाणेंच त्याची ती ॲक्शन विद्युतीनें झाली; ह्मणून त्या कान्स्टेबलला धन्याचा प्राण वांचावितां आला नाहीं. तितका तो हुशार असता तर, तोच फौजदार झाला असता. पण ठोंब्या होता ह्मणूनच फुकटाच्या नाटकांनीं त्याची अशी दैनाही उडवली नाहीं! नाटकी संसाराच्या आगेनें फौजदारफौजदारणींनां मात्र अखेर जाळलेंच !!!

# खऱ्या रसिकतेची आग कोण पचवील?

" कोण? " जानकीबाईंनीं आंतून विचारिलें.

" कवि आहेत काय? " दाराबाहेरच्या व्यक्तीनें जरा चांचपतच परत विचारलें.

" हो! आहेत. " जानकीबाईंनीं दार उघडीत उत्तर दिलें.

दाराबाहेर दोन तरुण स्त्रिया उभ्या होत्या. त्यांनां पाहून जानकीबाईनां तर आश्चर्य वाटलेंच; पण खुद्द रामभाऊंनांसुद्धां आश्चर्यानें घेरिलें. ते खोलींत एक नाटक लिहित बसले होते.

" आपण आम्हांला क्षमा करावी. " एकीनें म्हटलें. दोघीही खोलींत पण दारापाशींच उभ्या राहून खजिल झाल्या होत्या.

" क्षमा कसली करावयाची! " रामभाऊनें टाकानें कानाजवळचे केस सावरित म्हटलें.

" आम्ही रात्रीं... " दुसरी कचरतच बोलूं लागली, व शेवटीं थांबलीच.

" प्रथम खुर्च्यांवर बसा कशा! " जानकीबाईंनीं त्या दोघींनां खुर्च्या दाखवून म्हटलें; व त्या बसल्यानंतर त्या स्वतः पतीच्या खोलींतून शांतपणें निघून गेल्या. नंतर पांच पंचवीस सेकंदांनीं रामभाऊंनीं त्या दोघींनां भेटीचें कारण विचारलें.

" विशेष कारण खरोखर कांहीं नाहीं; " सुलोचना म्हणाली. " आम्ही दादांच्या बिऱ्हाडीं सत्यनारायणाला—

लगेंच तिनें जीभ चावली. कारण ती खोटें बोलत होती. दादांच्या घरीं त्या दिवशीं सत्यनारायणाची पूजा नव्हतीच. आणि असती तरी नाटक कंपनीचा मालक, नाटककार शहरांत असतां, त्याला तीर्थप्रसादाला बोलावणार नाहीं, हे शक्यच नव्हते. आतां रामभाऊ गेले नसते हा भाग वेगळा. नाहीं तरी ते स्वतःच्या नाटकाला तरी कोठें जात होते? सुलोचना आणि

महाश्वेता या दोघींनीं तरी त्यांच्या नाटकांतल्या स्त्रीभूमिकांवर चांगलीच कीर्ति मिळविली होती; पण त्यांनीं खुद्द नाटककाराला थिएटरांत कधींच पाहिलें नव्हतें. ज्याच्या नाटकांत रसिकतेचा नुसता जल्लोष उडतो, तो कवि किती तरी रसिक असेल, अशी दोघींची कल्पना. त्या कल्पनेला त्या नटी बळी पडल्या होत्या. नाटकांचा परिणाम प्रेक्षकांवर जर एकपट, तर खऱ्या नटांवर दसपट होतो; अर्थातच कवीवर शंभरपट झालाच पाहिजे; अशी त्या दोघींची रसमीमांसा होती. आणि त्या मीमांसेनुसार त्या दोघींनीं रामभाऊंची मुळींच चौकशी न करितां, एका रात्रीं नेमकें त्यांचें घर गांठलें होतें; असो. सुलोचनेची रामभाऊपुढें तिरपीट उडालेली पाहून, महाश्वेतेनें दुसराच स्पष्टवक्तेपणाचा डाव टाकिला. तिनें आपल्या अकल्पित भेटीचें खरें कारण रामभाऊंनां सांगून टाकलें.

" मग ? कळली कवीची रसिकता आतां ? " रामभाऊंनीं त्यांनां विचारिलें.

" इतक्यांतच कशी कळेल? "

" ठीक आहे. जरा इकडे येतां का ?" रामभाऊंनीं आपल्या पत्नीला खोलींत बोलाविलें. ती आल्यवर रामभाऊ त्या दोघींनां ह्मणाला : " ही माझी पत्नी पहा! कळली आतां रसिकता ?"

जानकीबाईकडे बारकाईनें पाहून महाश्वेता म्हणाली; " छे! अजून नाहीं ! "

" ठीक आहे ! हा माझा टाक पहा ! एका निबेशिवाय याचें एकही अंग धड नाहीं ! हे माझे कागद पहा! एकाच आकाराचे, पातळीचे अथवा रंगाचे, सारखे असे दोन तरी शोधून काढा पाहूं ! अथवा फार वर्णन नलगे ! या माझ्या टेबलाला तीनच पाय असून चवथ्या पायाच्या ऐवजीं एक मोडका खोका आहे. ! आली आतां रसिकता ध्यानांत ?"

पण महाश्वेतेला उत्तर देण्याला रामभाऊंच्या डीट्झ् लँपनें संधीच दिली नाहीं. कारण तो खोका दाखवायला गेला खरा; पण आपली अब्रू

बचावण्याकरतां त्या आधुनिक अग्निदेवतेनेंच एकदम राम ह्मटला. खरें सांगायचें म्हणजे, त्यांतलें तेलच संपलें होतें. रामभाऊकडे त्यारात्रीं एकीच्या ऐवजीं दोन वसंतसेना आल्या असल्या तरी, रजनीनाथ कांहीं अमावस्येला नभीं उगवणार नव्हता! पण रामभाऊ महावस्ताद! त्यानें पटकन् खिशांतून मेणबत्ती काढून लाविली; व हसून ह्मटलें ;

" बोला आतां कशी काय आहे तुमच्या कवीची रसिकता ?"

सुलोचनेला रामभाऊच्या दारिद्र्यापुढें पळून जावेंसें वाटलें. जानकीबाई तर बिचाऱ्या लाजेनें परत आपल्या खोलींत निघून गेल्याच होत्या. पण महाश्वेता मात्र सावधान चित्तानें पाहात होती. ती रामभाऊला उत्तर देणार, इतक्यांत जानकीबाईनीं दुसरा कंदील आणला ; व टेबलावर हळूंच ठेविला; व नंतर मेणबत्ती घेऊन त्या स्वयपाकघरांत निघून गेल्या.

" आपली रसिकता अजमावण्याच्या अगोदर, मी दादांनांच दोष देतें " महाश्वेता म्हणाली. " खुद्द कवीला अशा स्थितींत ठेऊन आपण मात्र चैनींत राहतात. बरें तें समजा. सुलोचनेचें काय मत आहे ? "

" मला असें वाटतें कीं, दारिद्य हा जबरदस्त दोष आहे. कवीची राहणी-सुद्धां काव्यमय पाहिजे. मला रामभाऊंची राहणी अगदीं गचाळ वाटते. क्षमा करा अं ! "

" क्षमा कशाला ? आपलें ह्मणणें अक्षरशः खरें आहे. आतां आपलें मत द्या कीं. "

" मला आपलें जमाखर्चाचें टिपण दाखवाल काय ? खाजगी गोष्टींत तर शिरत नाहीं ना मी ?"

" छे. छे. पण मी जमाखर्चच ठेवित नाहीं. राहतील ते पैसे शिल्लक; जास्त पैसे खर्च झाले तर कर्ज !"

" आपणांजवळची शिल्लक किती आहे ?"

इतक्यांत जानकीबाईनीं एक चांदीची टी सर्व्हिस आणली. लवकरच

गंगूनें--- घरच्या चाकरानें---टी-टेबल, फ्लॉवर-पॉटस्, पेट्रोमॅक्स वगैरे सामान आणून, त्या खोलीचें रूप आस्तें आस्तें पालटून टाकिलें. चहा घेत असतां रामभाऊनें सांगितलें ;

" या ट्रान्सफर सीनचें आपणांस आश्चर्य वाटेल; पण त्यांत आश्चर्य मुळींच नाहीं. दादांनीं माझे पैसे बुडवले नाहींत. शिवाय आमच्या दोघांच्याही वडिलांनीं आम्हांला थोडीशी इस्टेट ठेविली आहे. पण मला हेंच समजत नाहीं कीं, माझ्या सारख्यांची स्थिति हिंदुस्थानांत सर्वांचीच कां असूं नये ? सुलोचनेचें—ही सुलोचनाच ना?—हिचें म्हणणें खरें आहे. पण एका कुटुंबानें काव्यमय राहाणी भोगावी व त्यांच्याच शेजाऱ्यानें दारिद्र्यांत रहावें, यांत कोणतें काव्य आहे? हें गरिबीश्रीमंतीची अत्यंत हिडीस असें सामाजिक स्वरूप नाहीं कां? ही, आपण बसलों आहोंत ही खोली एका गरीब विद्यार्थ्याची आहे. पण येथें त्या विद्यार्थ्याचें अलौकिक बुद्धितेज आहे. माझ्या थाकल्या भावाला रसिकतेची राहणी मोकळी असूनही, त्याच्या रहाणींत केशकलापांकडेच पुष्कळसा वेळ खर्च होतो; आणि या पोराच्या त्या मोडक्या खोक्यांत----थांबा!"

रामभाऊनें त्या खोक्यांतून एक सुंदर चित्र काढिलें; व म्हटलें; " हें पहा! हा पोरगा विलायतेंत असता तर संपत्तिवान् व कीर्तिमान् झाला असता. येथें त्याजजवळ संपत्ति नाहीं म्हणून, त्याला कीर्तिही मिळावयाची नाहीं. स्वतः मला तरी या खोलींतच खरी स्फूर्ति होते! "

" पण आपण नाटकांनां कां येत नाहीं?" महाश्वेतेनें धाडस करून विचारलें.

" नाटकें प्रेक्षकांकरितां; एकवार नटांकरितांही; पण नाटककारांकरतां नाटकें नसतात. पण मी एखादवेळीं मूर्ख बनतोंच ना? मी कांहीं नाटकद्वेष्टा नाहीं."

" एकूण आपलें असें मत दिसतें कीं, कवींनीं आपल्या कृतीप्रमाणें राहूं नये."

सुलोचनेला कंठ फुटला! कवींनीं आपल्या कृतीच्या नेहमीं पुढें राहवें. त्यांनीं कल्पनासाम्राज्यांतलीं अनेक राज्यें इतरांकरतां हस्तगत करावीं. "

" परवां एका विद्यार्थ्यानें आपल्या नाटकामुळें आत्महत्या केली कीं." महा-

श्वेतेनें ह्मटलें. तिचें अंग त्यावेळीं थरारलें.

" तो नट असता तर कदाचित् केली नसती. " रामभाऊनें शांतपणें आपली बाजू मांडली.

" भागवतांनीं कशी केली?"

" ते नाटककार असावयाचे होते."

" नाटककार नाहीं कां आत्महत्या करीत ?"

" माझ्या ऐकण्यांत नाहीं. ते अल्पायुषी मात्र होण्याचा बराच संभव असतो. कारण त्यांनां या जगाचें हटकून नासणारें सौंदर्य नको असतें. तें सौंदर्याची सजीवता कायम ठेऊं पाहतात; व ती त्यानां कल्पनेच्या भरारीनेंच साध्य होते. कल्पनासम्राटांनां आत्महत्येचें कारण काय? भास कवि दारिद्र्यानें मला; पण तो दुःखानें पीडित होऊन आत्महत्या करण्यास प्रवृत्त झाला नाहीं. तुम्हांला माहित नाहीं; पण मी सांगतो हें ध्यानांत ठेवा कीं, स्विफ्ट नांवाचा कवि वेडा होऊन मेला; पण त्यानें आत्महत्या केली नाहीं. कवीचें वेड म्हणजे मानवी मनाच्या अन्यायाच्या आजाराचें एक द्योतक आहे. यापेक्षां जास्त सांगण्याचें कारण नाहीं. "

नंतर लवकरच त्या दोघी आपल्या बिऱ्हाडीं गेल्या; पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं शहरांत एक विलक्षण बातमी पसरली कीं, प्रसिद्ध नटी महाश्वेता इनें आत्महत्या केली. कारण तिच्या प्रेमाला रामभाऊनें आदल्या रात्रींच झिटकारून तिचा प्रीतिभंग केला. पण तिनें पत्रांत लिहून ठवलेलें आढळलें कीं, "खऱ्या रसिकतेनें राहणें हें आग पिण्यासारखें आहे. सामान्य माणसांनां तसें राहतां येतच नाहीं; म्हणून ते दंभानें राहतात. मला अशा दांभिक रसिकतेचा वीट आला; व खरी रसिकता पचावितां येणें मला केवळ अशक्य आहे; सबब मी आत्महत्या करतें. याचा दोष कोणाकडेच नाहीं." तिनें आपली इस्टेट रामभाऊच्या घरच्या विद्यार्थ्याला दिल्याचेंही पत्रांत लिहून ठेविलें होतें.



# मजवरि धुरळा त्रिभुवनिंचा!

[ या मथळयाच्या दोन- अर्थातच वेगवेगळया विषयांच्या-- गोष्टी ' नव्या मौजेतून प्रसिद्ध झाल्या आहेत; म्हणून त्या या पुस्तकात दिल्या नाहींत. ]

मी आणि माझा एक स्नेही, असे दोघे, एकदां, सायंकाळीं, हँगिंग गार्डनमध्यें, अरबी समुद्राकडे तोंड करून बसलों होतों. आमचें संभाषण कांहीं विशेष महत्वाचें नव्हतें; परंतु आमच्यापासून दहा बारा पावलांवर बसलेल्या कांहीं मित्रांमध्यें मात्र खूपच जोराचा वादविवाद चालला होता. शेवटीं तो इतका भरांत आला कीं, आह्मी दोघेही, आपलें नकळत, त्यांचें तें प्रेमाचें भांडण ऐकूं लागलों.

" तूं कांहीं ह्मण बुवा विनू, तुझ्या गप्पांवर माझा मुळींच विश्वास बसत नाहीं; " एक जण ह्मणाला.

" कसा बसेल ? " विनूनें उत्तर केलें; " त्या गोष्टीच अशा आहेत कीं सबळ पुराव्याशिवाय त्या खऱ्या वाटणारच नाहींत. "

" आणि तुझे पुरावे सबळ आहेत, असें आमच्यांपैकीं एकालाही वाटत नाहीं. " दुसऱ्या स्नेह्यानें विनूला फटकारा मारिला.

" बाळकृष्णपंत उपाध्ये किती थोर माणूस ! " तिसऱ्यानें विनूला जास्तच डंवचण्याच्या बुद्धीनें ह्मटलें; " त्यांच्यासंबधीं, विनू, तुझ्या सारख्या पोरानें असें बोलूं नये. "

" बोलूं नये ! " विनू रागानें उद्गारला; " अरे ! लिहीनसुद्धां !! नव्हे लिहीत आहेच. "

" मोठे लेखणीबहाद्दरच किनई ! " पहिल्यानें विनूला चिडविलें.

" दिसेल; लवकरच दिसेल. सारी मुंबई हदरून सोडीन!"

" सोडशील बुवा; खरेंच सोडशील ! तूं मुंबई खरीच सोडशील, आणि स्वतः चांगले हदरूनच मुंबई सोडशील. "

सारे स्नेही हसले. तरी विनूच्या लक्षांत ती खोंच आली नाहीं. तो

आपल्या लेखणीची तारिफ करूं लागला. शेवटीं एका स्नेह्यानें तर त्याला स्पष्टच सांगितलें;

" विनू ! लेखणीनें नेहमीं सत्यच प्रस्थापित होतें असें कां तूं समजतोस ? हें पहा, तुला आम्ही अखेरचें सांगतों कीं, चक्षुर्वैसत्यम् ! तुझीं तीं पत्रें घाल चुलींत, व त्या जाळावर चहा करून आम्हांला दे. आमची खात्री व्हावी, अशी जर तुझी इच्छा असेल, तर आम्हांला तू एकादा सूचक, असा तरी, प्रत्यक्ष प्रकार दाखीव. तुझ्या वर्णनावरून तें कांहीं कठीण नाहीं. "

" कठीण ! " विनू उद्गारला, " फारच सोपें आहे ! सुदैवानें आजच रात्रीं साडे अकरा वाजतां तुम्हांला पहावयास मिळेल. "

" साडे अकरा ! Nonsense ! कोणताही सभ्य गृहस्थ ती वेळ ठरविणार नाहीं. विनू ! भलतेंच बकूं नकोस ! "

" मला क्षमा करा ! नवाची टाइम ठरली आहे.पण नवाची तरी कां द्यावी?"

" कामाच्या बाहुल्यामुळें असेल. पण एवढें कशाला, आपण आज जाणारच आहांत ना ? "

विनू आनंदानें म्हणाला. " हो ! पण गुपचुप अं ! नलिनी नाईक नांवाची एक मास्तरीण त्यावेळीं त्यांनां भेटणार आहे. आपण अगदीं शेजारच्या घरांतल्या अगदीं समोरच्या खिडकींतून, लपून सारा प्रकार पाहूं या ! "

असा बेत ठरवून ते सगळे आपापल्या घरीं जाण्याकरितां निघाले. पण त्यांपैकीं एकानें मला ओळखिलें; व तो विनूच्या कानाशीं कुजबुजला. थोड्या वेळानें ज्यानें मला ओळखिलें तो नमस्कार चमत्कार करून मला म्हणाला, " आपण आमचें संभाषण ऐकलें असेलच. "

" ऐकलें नाहीं; ऐकूं आलें. " मी सांगितलें.

" मग आपलें काय मत आहे ? बाळकृष्णपंत उपाध्ये आपल्या ओळखीचे असतीलच. "

" असतील काय ! आहेतच. " विनूनें जोरानें म्हटलें. " प्रत्येक टिळक-

शिष्याला उपाध्यांची खडान्खडा माहिती असलीच पाहिजे. ”
“ हो. मी आजच सकाळीं पुण्याहून आलों. मला टिळकांनींच शिकवून ठेविलें आहे कीं, ‘ राजकारण, वाङ्मयसेवा, वेदविद्या वगैरे सगळया झूट बाता होत; तूं आपल्या उपाध्यांच्या वर्तनावर डोळा ठेव कसा. त्यानेंच देश स्वतंत्र होणार आहे. ’ त्याच कामाकरतां मी इथें आलों आहे. ”

माझे हे टोले मात्र विनूला समजले. तसा तो स्नेह्यांना म्हणाला, “ निफाडकरांनां मुंबईचें राजकारण कधींही समजावयाचें नाहीं. ”
लवकरच तो कंपू टेकडी उतरूं लागला. मग मी माझ्या स्नेह्याला म्हटलें;
“ बघितलेंस; ही अशी घाण वाङ्मयांत निर्माण होते. ”
“ समाजांत घाण असेल तर ती काढलीच पाहिजे.” स्नेही म्हणाला.
“ असेल तीच काढा; व खुबीनें काढा. पण नसती कल्पून तिचा शाब्दिक कॅर्बॉनिक वायु सोडूं नका. ”
“ पण उपाध्ये प्रकरण खरें आहे. ”
“ पाहूं या ! आपणही त्याच इमारतींत शेजारच्या खोलींत लपूं या. ”

अशा रीतीनें उपाध्यांची खोली म्हणजे स्टेज, व समोरच्या दोन खोल्या म्हणजे प्रेक्षकांची जागा झाली. अर्थातच प्रेक्षक लवकर आले. आम्ही दोघे मात्र ८–५५ ला गेलों. पण तेव्हां देखील नाटक सुरू झालेले दिसलें. बाळकृष्णपंत उपाध्ये आपल्या खोलींत अत्यंत सचिंतपणें येरझाऱ्या घालित होते. त्यांनीं मध्येंच सुस्कारे टाकावे; वर आढ्याकडे पहावें; व शेजारच्या खोलींत डोकावून निराशेच्या मुद्रेनें आपल्या खोलींत येरझाऱ्यांचें सत्र चालू ठेवावें. आमच्या शेजारच्या खोलींतून विनूची टीका आम्हांला स्पष्ट ऐकूं येई. तो म्हणत होता; “ पाहिलें; म्हातारा कसा तरव-रला आहे ! हं ! हंसायचें नाहीं ! ”

माझा स्नेही विनूच्याच मासल्याचा होता. त्यानेंही तशीच टीका चालविली. पण मी त्याला म्हटलें कीं, “ खरा प्रकार वेगळाच असेल

पाहिजे. उपाध्यांच्या घरी कोणी आजारी आहे काय? ”
“ हो. त्यांची पत्नी आजारी आहे. ”
“ तर मग, मी नक्की सांगतों कीं, त्यांच्याविषयीं सगळ्या कंड्या खोट्या आहेत. त्यांचें आपल्या पत्नीवर— शुक ! शुक ! ”

उपाध्यांच्या खोलींत एक तरुण बाई आली. त्यावेळीं ते स्वतः मात्र शेजारच्या खोलींत डोकावत होते. तिकडून लक्ष काढून ते ज्यावेळीं परत खोलींत फिरले, तेव्हां त्या बाईला पाहतांच ते दचकले. पण ती बाईच त्यांनां हंसून म्हणाली;
“ मला वाटतें, जिन्याचा दरवाजा हा आहे; व आपली वेळही मी चुकविली नाहीं. ”
“ नलिनीबाई !” उपाध्ये शांतपणें पण हळूं, खोल आवाजांत तिला ह्मणाले;
“ आपण आज आलां नसतां तर बरें झालें असतें ! ”

या शद्बांनीं नलिनीचा नूर एकदम बदलला. थोडा वेळ जाऊं देऊन ती त्यांनां दीनवाणीनें ह्मणाली;
“ खरें आहे. पण हा प्रश्न माझ्या पोटापाण्याचा आहे; व आपण मला ही रात्रीची वेळ दिली तरी ती मला सांभाळणें भाग होतें. ”
“ बाई ! मी तरी काय करूं सांगा बरें ! ही माझी डायरी पहा. आज २३ एप्रिल. या सबंध वर्षांत आजपर्यंत असा एकतरी दिवस मला या डायरींत दाखवा कीं, मला, माझा ह्मणतां येईल असा एक क्षण तरी, रात्रीं ११ ते ७ खेरीज असतो ! माझी नोकरीच अशी आहे कीं, मला अहोरात्र, मंडळींनां भेटावें लागतें. पुरुषांनां भेटीस बोलावतां स्त्रियांनां वाट पहावी लागते; पुरुषांसमोर त्यांनां बोलतां येत नाहीं; ह्मणून त्यांनीं आपण होऊन आपली वेगळी व्यवस्था करा, अशी विनंती केली. मी तसें करतांच मजवर माझे लेखक शत्रु तुटून पडले. दुर्दैवानें मी लेखक आहे; आणि कविता करण्याचें पाप देखील मजकडून होतें. मी संपादक, कवि, शाळेचा मुख्याध्यापक, व शाळाधिकारी असून माझीं मतें सुधारकाचीं आहेत. त्यांत मी

स्वतः मुळींच खटपट न करतांही मला किताब मिळाले आहेत. अशा स्थितींत, माझ्या सद्वासनांची, सम्दावनांची, सदाचरणाची, नव्हें प्रत्यक्ष सच्छीलाचीही विटंबना होत आहे हें मी ओळखून आहे. पण मला येवढेंच वाईट वाटतें कीं, ज्या स्त्रियांनां मी थोडी फार मदत करतों, त्याही माझ्या निंदकांनां मदत करतात. ''

" आपण त्या स्त्रियांनां दटावित कां नाहीं ? आणि टीकांनां उत्तर कां देत नाहीं ? ''

" मला जरूर वाटत नाहीं; व मी क्षुद्रांनां नसतें महत्व देत नाहीं. कोणत्याही स्त्रीची भेट घेतांना, मी माझी पत्नी —

' पत्नी ' ह्मणतांच त्यांच्या नेत्रांतू अश्रुबिंदु चमकूं लागले. पण स्त्रीसमोर कोणताहि पुरुष आपल्या डोळ्यांत अश्रु राहूं देत नाहीं. उपाध्ये तर धीर गंभीर होते त्यांनीं खिडकींतून डोकावून अश्रु पुसून टाकले.

इकडे विनूला त्याचा एक स्नेही ह्मणत होता;

" कां राव! काय ह्मणतां आतां ?''

"जरा दमानें घ्या. हें तर उपाध्याचें कोर्टिंग आहे.''तिकडे नलिनी म्हणाली

" बाबासाहेब,, आपणांशीं मी मन मोकळें करून बोलूं कां ?''

" बोला! पण अगोदर खुर्चीवर बसा. कृष्णे! अग कृष्णाबाई !!''

" आपण आपल्या मुलीला कां बोलावतां? नका बोलावूं. मला तिच्यासमोर आपणांशीं मोकळ्या मनानें बोलतां येणार नाहीं. '' नलिनी खुर्चीवर बसतां बसतां म्हणाली. उपाध्येही एका खुर्चीवर बसले.

" ठीक आहे. आपणही माझ्या निंदकांच्या माळकेंत जाऊं इच्छितां!''

" छे छे ! आपला वादविवाद षड्कर्णी होणार नाहीं, असें मी आपणांस वचन देतें. '' असें ह्मणून तिनें आपला नाजूक गोरा हात पुढें केला. उपाध्यांनींही आपला हात पुढें केला. तिनें आपला हात त्यांच्या हातावर हळूंच ठेविला; पण माघारा घेतला नाहीं. आपल्या अंगांतील प्रेमाची ऊब

त्यांच्या अंगांत जात आहे असा तिला भास झाला; व त्याच स्थितींत ती त्यांना गोड शद्वांत ह्मणाली, "माझें काम होईल ना ? "

" नलिनीबाई!" उपाध्यांचा हात सहजासहजीं खालीं पडला; "आपलें काम फार कठिण आहे."

" मला तें माहित आहे; पण आपण जर तें कराल तर मी आपली "जन्माची सोबतीण—

" सोबतीण!"

" A friend! A companion!"

" Presumptuous girl ! " उपाध्ये उद्गारले.

" कां बरें! तुह्मीं माझ्यापेक्षां सर्वतोपरीनें श्रेष्ठ असलां, तरीं कविहृदयाला तें भेदाभेद पाळणें योग्य नव्हे."

" परंतु कविहृदयाला देखील मैत्रीला समानशील व समान विद्याभिरुचि लागतेंच. "

" मग आमच्यांत ती नाहीं की काय ? एक पैशानेंच मी लाचार आहे. तें मला मिळूं द्या; ह्मणजे मग आमच्या प्रेमांत काय उणेपणा राहील? "

" प्रेमांत ?"

" कां नाहीं? मीही सुधारक मतांची आहे. मी बी. ए. आहे. ईश्वरानें मला थोडेंसें रूपही दिलें आहे. मी आपल्या कविता वाचतें ; व पुढें मागें माझ्याही कविता मी आपणांस दाखवीन. मी आपल्या स्वभावाची परीक्षा घेत आहे."

" पण माझी दुष्कीर्ति आहे ना?"

" दुष्कीर्ति नसते कुणाची ? टिळकांची नव्हती कां ?

"Silence ! त्यांच्या नांवांचा असा दुरुपयोग केलेला मी सहन करणार नाहीं."

" कां नाहीं? " नलिनीनेंही हट्टवादीपणा चालविला. " टिळकांची कोर्टा-बाहेर दुष्कीर्ति झाली नाहीं; याला कारण, त्यांना स्त्रीलोभाची संधीच

आली नाहीं."

"त्यांनीं येऊंच दिली नाहीं."

"हा त्यांचा पळपुटेपणा झाला."

"उलट त्यांचा त्यांत मोठेपणाच होता. राष्ट्राच्या उद्धारार्थ त्यांनीं एकाच दिशेला जाणीवेनें स्वतःस वाहून घेतलें हा काय पळपुटेपणा झाला?"

"आणि पुस्तकें वरीं लिहिली ?"

"मुली !"

"मुली !"

"हो मुली!" उपाध्ये आपल्या खुर्चीवरून उठून उभे राहून अत्यंत गंभीरतेने म्हणाले; "तुला तें समजावयाचें नाहीं! माझा राजकीय पक्ष त्यांच्याकडचा नव्हता, तरी मी खचित खचित सांगतों कीं, त्यांच्या पक्षांत त्यांच्यासारखा एक जरी लोकनायक असता, तरी त्यांनीं राजकारणांत मुळींच लक्ष न घालतां, वाङ्मयसेवा आणि शास्त्रीय अभ्यासच केला असता. पण त्यांत-ही त्यांनीं आपलें जीवितसर्वस्व ओतिलें असतें;... एका परिस्थितीनें त्यांच्या शीलाला बट्टा लागणार होता खरा; पण..." उपाध्यांचा चेहरा जास्तच तेजःपुंज होऊं लागला;—"त्यांच्या राष्ट्रीय तपोबलानेंच तो लोकसमूहांत पसरला नाहीं असें नाहीं; तर त्यांच्या कार्यैकनिष्ठेनेंच तें कार्य झालें!"

"मग आपण तसें कां करीत नाहीं?"

"कारण माझी परिस्थिति वेगळी; व परिस्थितिपेक्षांही माझी कविवृत्ति हेंच खरें कारण होय."

"टिळक कवि असते तर!

"कधींच चमकले नसते!"

"एकूण कवित्व निंदास्पद आहे?"

"अरसिकांच्या, भोंदूंच्या व मत्सरग्रस्तांच्या निंदेला कवित्व जागा देतें खरें. त्यांत माझी ही नोकरी व राजकीय पक्ष यानीं भर पडते. शिवाय माझी राहणीही आगरकरांसारखी नाहीं."

" आतां एक अत्यंत नाजूक प्रश्न विचारूं कां ? "

" विचारा ! "

" आपणांवरील गैरशिस्त टीकेमुळें आपल्या पत्नीचेंही मन दूषित झालें असेल कां ? "

या प्रश्नानें उपाध्यांच्या भोंवतीं सारा दिवाणखाना फिरूं लागला! त्यांनां अतोनात दुःख झालें. आपणांसंबधीं बाहेर किती कालकूट निंदाविष पसरत आहे, याची त्यांनां कल्पना नव्हती. पण त्यांतही त्यांनीं धीरोदात्त-पणाच दाखविला. ते म्हणाले;

"या! अशा माझ्या मागें या! मात्र हळूंच या, व कांहीं देखील बोलूं नका!"

त्यांनीं तिला शेजारच्या खोलींत नेलें. खोलींतला मंद दिवा मालवून त्यांनीं स्विचनें इलेक्ट्रिक दिवा लाविला. त्यासरशीं ते त्यांच्या पत्नीप्रेमाचें दृश्य, आम्हां सर्व प्रेक्षकांनां स्पष्ट दिसलें. लवकरच ती खोली पूर्ववत मंद प्रकाशी झाली; व ती दोघें परत दिवाणखान्यांत आलीं. एक दोन मिनिटें त्यांपैकीं कोणीच बोललें नाहीं. नंतर नलिनी अत्यंत सौम्यपणें ह्मणाली,

" बाबासाहेब! आपल्या हृदयाची मला आजच खरी परीक्षा झाली! आपलें वर्तन वाईट असतें तर आपल्या पत्नीच्या बरळण्यांत तरी इतके उदात्त प्रेमोद्गार निघालेच नसते! आपणांवरील टीकेची त्यांनांही क्षिति नाहीं; याचें कारण त्यांच्याप्रमाणें आपलेंही अलोट प्रेम व सच्छील वर्तन!...... पण माझी आणखी एक खोंच आपण सहन कराल काय? तींत देखील माझा स्वार्थच आहे. आणि मी तो डोळे उघडे ठेऊन साधून घेईन ह्मणतें. मात्र आपण घटकाभर डोळ्यांवर कातडें ओढावें. "

" बोला. "

" परमेश्वरानें ताराबाईनां उदंड आयुष्य द्यावें अशीच माझीही इच्छा आहे! पण ...... यदाकदाचित् ...... त्यांचें बरेंवाईट झालें, तर मला त्यांचें स्थान द्यावें. क्षमा करा अं! "

आतां मात्र उपाध्यांकडून राहवेना. त्यांच्या नेत्रांतून टपाटप अश्रु-बिंदु गळूं लागले. थोड्यावेळानें त्यांचें दुखः हलकें झालें; व मग ते शांत-

पणें उद्गारले;

" मी विधवाविवाहाचा पुरस्कर्ता असलों तरी, माझ्या पत्नीचें स्थान मी या जन्मीं तरी दुसरीला स्वप्नांतसुद्धां दिलें नाहीं, देत नाहीं, कदापि देणार नाहीं. "

" पण मग आपला सांभाळ कोण करील ? "

" माझा छोटा बाबू या शरीराचा सांभाळ करील; माझें कवित्व माझ्या मनाचा परिपोष करील, व माझी पत्नी स्वर्गातूनही, माझ्या हृदयावर प्रेमाची पाखर घालीत राहील ! "

असें म्हणून ते आपल्या पत्नीच्या खोलींत निघून गेले; नलिनीही आपल्या घरीं चालती झाली. प्रेक्षकही निघून गेले.

तरी देखील सहासात महिन्यांनीं विनूची, " **नलिनी नाईक** " ही कादंबरी पुस्तकविक्रीच्या दुकानांत आलीच. तींत बाळकृष्णपंत उपाध्ये यांची अत्यंत घाणेरडी निंदा केली होती. तिकडेही उपाध्यांनीं व त्यांच्या पत्नीनें दुर्लक्षच केलें. परंतु मी मात्र आमच्या पिढीचा नादानपणा मनांत येऊन हळहळलों. मला माझा स्नेही ह्मणाला;

" तुम्ही या कादंबरीचें परीक्षण करून, खऱ्या गोष्टी जनतेला सांगत कां नाहीं ? "

" खऱ्या गोष्टींनां स्पष्टीकरणाची जरूर केव्हां असते ? त्या निंदकाला कांहीं महत्व असेल तर ! ज्याला लेखणीचा बाजार मांडावयाचा आहे, बाजारांतून कुशलतेनें लेखणी चालवावयाची नाहीं, त्याला काय महत्त्व आहे ? बाकीं असत्याच्या आधारें, कुणातरी एका विरुद्ध पक्षाच्या मोठ्या माणसाला चावे घेऊन, तो कांहीं आपल्या वाटेस जाणार नाहीं, अशा खात्रीनें, आपलें उदरंभरण करणारे जर आमच्या राष्ट्रीय पक्षांत उत्पन्न होऊं लागले, तर मात्र सत्याधिष्ठित गांधी, टिळकांचा पक्ष दुबळा केल्याशिवाय राहणार नाहींत हें माझें भविष्य आहे. दुधखुळे पोपटपंची वक्ते, फंडाचें लचके तोडणारे बाजारी पोरकट मुत्सद्दी, व असले क्षुद्र लेखक, यांनां आपल्या पक्षाचे भावी स्तंभ ह्मणून टिळकांचा आत्मा कधींही ओळखणार नाहीं. "

# दोन बहिणी



( लेखिका---सौ. इंदिराबाई निफाडकर )

वास्तविक या गोष्टींत तीन बहिणी आहेत. परंतु गोष्ट वाचल्यावर, मधलीचें महत्व किती आहे, हें वाचकांनां समजेलच. कारण ती डॉक्टरीण होती. मोठी गोदू. तिला वाटे, मी राणी होईन. धाकटी शांती. तिला घोड्यावर बसणें, बंदुक मारणें, दोराचा फास अचूक फेकून, हरिण पकडणें त्याचप्रमाणें पुरुषांच्या सभेंतही, विनयानें पण न कचरतां बोलणें, अशा गोष्टी मनापासून आवडत. त्या तिघींचे वाटतील ते कोड-कौतुक पुरवायला बाबासाहेब पुंरदरे समर्थ होते; व ते पुरवीतही असत. परंतु रेवतीबाईंना तें आवडत नसे. त्या जुन्या मताच्या होत्या. तिन्ही मुलींनीं आतां संसाराला लागावें, ह्मणजे मी सुखानें मरेन, असें त्या ह्मणत. डॉक्टारणीनें तर लग्न करावयांचेंच नाहीं, असा बाणा धरिला होता. ती पैसेही निर्दयतेनें मिळवी.

गोदूचें ह्मणणें खरें झालें. ती + + + संस्थानची राणी झाली.

एकदां तिघी बहिणी बाबासाहेबांच्या जहागिरीच्या खेड्यांत मजेखातर रहावयास गेल्या. त्यांचे आईबापही तेथें होते. एक दिवस शेतकऱ्यांची सभा होती. वाढलेला शेतसारा न देण्याबद्दल शेतकऱ्यांनीं ठरविलें होतें. त्या सभेंत शांती शेतकऱ्यांच्या तर्फे बोलली. तिचें भाषण अर्थातच सर्वांनां आवडलें. परंतु राणीसाहेबांनां आवडलें नाहीं. त्या जरी कट्टया बोलणाऱ्या नव्हत्या तरी, बी. ए. झाल्या होत्या. शिवाय रयत बिथरली तर आपल्या वडीलांचें व आपलेंही उत्पन्न बुडेल, असें त्यानां भय वाटलें. ह्मणून त्यांच्या बहिणीच्या विरुद्ध झालेल्या भाषणाला तिखटपणा आला. शांतीच्या मनांतून तिला उत्तर द्यावयाचें होतें. पण भरसभेंत मोठ्या बहिणीचा पाणउतारा करूं नये, अशा बुद्धीनें ती स्वस्थ बसली परंतु + + + + या संस्थानाचा तरुण धनि, राजे शांताराम हे शांतीच्या मदतीला आले. आपण आपल्या रयतेचा शेतसारा, त्यांच्या पुढाऱ्यांच्या सल्ल्यानें ठरवून कायम करण्यास तयार आहोत, असें त्यांनीं जाहीर केलें.

सभा आटोपली. घरीं पुरंदरे मंडळींत सभेविषयीं कडाक्याचा वाद होत होता. तोंच राजेसाहेब तेथें गेले. तेव्हां वादाला खूपच रंग चढला. तो वाद सांगण्याचें प्रयोजन नाहीं. तो सर्वांच्याच परिचयाचा आहे. पण वाद संपून, हळूहळू, शांता व शांताराम, याशिवाय इतर मंडळी दिवाण-खान्यांतून निघून गेली. तेव्हां राजेसाहेब ह्मणाले, " आजचें माझें व्याख्यान आपणांस कसें वाटलें ?

" दांभिकतेचें! "

" कां बरें? " राजेसाहेबांनीं वाईट वाटून विचारलें.

" वक्त्यानें आगोदर कृति करावी व मग बोलावें. "

राजेसाहेब ओशाळले; व कांहीं वेळानें ह्मणाले, " आपणांजवळ मी एक नाजूक गोष्ट काढूं कां? "

" नको ! मला लग्न करावयाचें नाहीं."

" जन्मभर ? "

" हा विषय आतां पुरे! "

" पण मी वाट तरी पाहूं कां? "

" पराक्रम करावयाचा असल्यास? "

" हल्लीं पराक्रम करावयास जागा आहे तरी कां? आणि मी आपल्या रयतेचा करभार कमी करण्याची तयारी दाखविली, हें कांहींच नाहीं कां? "

" शब्द ह्मणजे कृति नाहीं हें एक. दुसरें असें कीं, जमीन मुळीं तुमची नाहींच– "

" मग कोणाची? "

" रयतेची. मालक रयत. "

" मग आह्मी कोण ? "

" रयतेनें स्वसंतोषानें नेमल्यास रयतेचे एक अधिकारी. "

शांताराम तसा हुशार माणूस होता. त्यानें शान्तेच्या म्हणण्याचें मर्म चटकन् ओळखिलें. त्याचें तिच्यावर खरोखर प्रेम होतें.

पुढें कांहीं दिवसांनीं तीं दोघें शिकारीस गेलीं असतां, कांहीं अंतरावर त्यांनां कसलीशी गडबड ऐकूं आली. पहातात तों तिथे पठाण गोदूला बळ-जबरीनें मोटारींत बसवीत आहेत असें त्यांनां दिसलें. पठाणांनीं यांनां ओळखून यांच्यावर हल्ला केला. त्या दंगलींत दोन पठाण पळाले; पण तिसऱ्याच्या मुसक्या बांधून यांनीं गोदूलाही त्याच मोटारींत घरीं आणिलें. मोटार एका अति प्रसिद्ध राजाची होती. शिवाय त्या कैद्याकडूनही गोदू-विषयींचा कट उघडकीस आला.

त्या रात्रीं पुरंदऱ्यांच्या घरीं शांतारामासह सर्व मंडळी असतां, त्यांनीं संधी साधून, शांतेची फिरून मागणी केली. शांता ह्मणाली; " आपण परा-क्रम केला ही गोष्ट खरी. परंतु सर्व परिस्थितींत नीतिधैर्य आपण असें रुजवाल तेव्हां खरें. आपण आपल्या शहाण्या दिवाणजींच्या हातीं संस्थान वर्षभर देऊन, स्वकष्टानें पोट भरावें; अहो-रात्र आपल्या रयतेची मनःपूर्वक सेवा करावी. मी देखील आपणांबरोबर तसेंच काम करीन. पोटापुरतें खाणें, साधें पण स्वच्छ कपडे वापरणें, दुसऱ्या करतां सर्व परिश्रम घेणें, अशी राहणी मनुष्याला शोभते. हें आपणांस कबूल असेल तर मी बाबांनां सांगतें."

त्याप्रमाणें राजेसाहेबांनीं कबूल केल्यावर वाडिलांच्या परवानगीनें तीं राहूं लागली. त्याचा परिणाम असा झाला कीं डॉक्टरिणीनें आपला दवाखाना धर्मार्थ चालाविला नाहीं; पण उलट तिनें आपल्या सारख्याच मताच्या एका डॉक्टराशीं लग्न लाविलें. आणि गोदूनें मात्र आपल्या पतीकरवी व स्वतः आपल्या रयतेचीं दुःखें दूर केलीं.

शांता व शांताराम यांचा विवाह झाला.

एका आईच्या उदरांतून आलेल्या बहिणींत किती हा फरक!



# नारदांपेक्षां वाल्मीकिच श्रेष्ठ!

भाद्रपदाची अमावास्या. वार शनिवार. समय संध्याकाळचा. वास्तविक ती माझ्या चिन्हार्डी असावयाची. परंतु ती सायंकाळचा देखावा मांगीतुंगीवरून पाहण्याच्या मोहाला बळि पडलों. जित्याची खोड मेल्याशिवाय जात नसते. मेल्यावर तरी जाते किं नाहीं देव जाणे. माझी सृष्टिशीं बोलण्याची खोड मात्र त्या दिवशीं चांगलीच जिरली. मी मांगीतुंगीपैकीं तुंगीवर जाऊन बसलों. खिशांत आमचा "**गोदातटींचा गुंजारव**" होता. कधीं त्यांतल्या कविता वाचित, कधीं त्यांतला मधु रव ऐकत, कधीं आसमंतात दृष्टि फेकित, पण पुष्कळसा वेळ सृष्टिसंदेशाविषयीं विचार करित मी बसलों होतों. मी इतका गर्क झालों होतों कीं, माझ्यापुढें दोन व मागें दोन असे चार भिल्ल नंग्या समशेरी घेऊन उभे आहेत हें मला माहीत देखील नव्हतें. त्यांपैकीं एकानें मला हलवून दरडावलें, "चल ऊठ! बिगि बिगि चल!!" मी त्यांच्याकडें पाहिलें; व माझी परिस्थिति पटकन लक्षांत आली. माझ्या अंगीं अनत्याचारी असहकारिता पुष्कळच बिंबली होती. तरी त्यांतूनहा महाराष्ट्री रक्त उसळलेंच. मी त्यांनां विचारिलें, "कोठें जायचें.?"

"जास्त बोलूं नको!"

"अरे! वाजवीपेक्षां जास्त बोलणें हा तर आम्हां देशभक्तांचा हक्कच आहे." मला विनोदीवृत्तीनें त्यावेळींही सोडिलें नाहीं. मी म्हणणार होतों "जन्मसिध्द हक्क आहे!" पण म्हटलें या भिल्ल्यांनां तें काय कळणार!"

"तूं नाहीं उठत?"

---

**टीप— वाल्मीकिमुनि हा वाटमाऱ्या कोळी असून, नारदाच्या उपदेशानें तो मुनिपद पावला ही दंतकथा प्रसिद्ध आहे.**

" अरे ! जिथें सारा देश निजला, तिथें मी एकट्यानें उठून काय होणार ? "

त्या चोर नाइकानें शिटी फुंकतांच आणखी दोन भिल्ल आले. त्यांच्याजवळ काढण्या होत्या. त्यांनीं मला करकचून बांधलें. एकानें माझी मोट आपल्या पाठीवर घेतली; व आमची स्वारी ते नेतील तिकडे जाऊं लागली. " कांहीं होवो ! लोकमान्यांप्रमाणें मी देखील, प्रत्यक्ष उचलल्या-शिवाय जागचा हललों नाहींच किनई ! " या भावनेतच मी संतुष्ट राहिलों.

सुमारें अर्ध्या तासांत आमचा प्रवास संपला. मला एका विवरांत नेऊन ठेवण्यांत आलें. पण तेथें सत्यनारायणाच्या पूजेची तयारी पाहून मला अतोनात आश्चर्य वाटलें. सर्व विवरभर एकजात सशस्त्र भिल्ल बसला होता. आपण करतों त्यापेक्षांही उंची तयारी त्यांनीं देवपूजेच्या बाबतींत केली होती. पेट्रोमॅक्सची बत्ती पाहून मी थक्कच झालों. मला लवकरच मोकळें करण्यांत आलें. माझ्याकडे मुख्य यजमानानें निरखून पाहिलें. माझें पुस्तक त्यानें चाळून पाहिलें. उलटें धरलेलें पाहूनच त्याच्या निरक्षरतेची साक्ष पटली. तें त्यानें एका बाजूला ठेवून मला विचारिलें;

" आपणांजवळ किती ऐवज आहे ? "

" अंगावरले कपडे, ते पुस्तक व मी स्वतः, एवढाच."

माझ्या या उत्तरानें भिल्लांत चळवळ झाली. ज्यांनीं मला तेथें नेलें होतें, त्यांच्या अपयशाबद्दल हेटाळणी सुरू झाली. ती पाहून नाईक त्यांना म्हणाला;

" तुम्ही चुकतां; आज चांगलीच शिकार मिळाली आहे. तोत्या ! तुमचा आरंभ फारच उत्तम झाला आहे. " नंतर तो मला म्हणाला; " आपणांस पूजा सांगतां येत असेलच. पोथीही वाचाल ना ?"

ती वेळ नकाराची नव्हती. मी चाटून रुकार दिला. पहाऱ्यांतच

स्नान केलें. चांगलें ऊन पाण्यानें, उटणीं वगैरे लावून स्नान केलें. एक उंची येवल्याचा पीतांवर नेसलों; व भटजींच्या पाटावर येऊन बसलों. व पोथी! मागितली. " पोथी! हें पुस्तक कसलें? " नाईकानें विचारालें.

क्षणभर गुंजारवाचें नाटक करावें असें वाटलें. पण त्या पुस्तकाला कमीपणा आणणें मला तशा स्थितींतही जड गेलें. मी खरी गोष्ट सांगितली; तथापि पोथीवांचून अडून बसण्याचें कारण नव्हतें. मी तोंडीं सांगण्यास तयार होतों; असो. पूजातर यथासांगच केवळ नव्हे, तर जादांग थाटून दिली. व नंतर कथा सांगण्यास मी आरंभ केला. पहिलीं पांच मिनिटें उत्कृष्ट गेलीं. श्रोतृगण आनंदानें डोलूं लागला. मी मांझी कैद्याची स्थिति विसरलों. देशभक्तांचें भूत माझ्या अंगांत संचरलें. लौकरच माझी व्याख्यानबाजी थयमान करूं लागली. कथांतून उपदेश, उपदेशांतून टीका व टीकेकरतां उपकथा, असा माझा वाक्-प्रवाह सुरू झाला. टीकेच्या भरांत सत्यनारायणाची मी टवाळी करूं लागलों. पराक्रमी माणसांच्या पुढें दैवच केवळ नव्हे, तर देवदेखील लटपटतो, असें मी ठासून सांगितलें; व तें सिद्ध करण्याकरतां, सीझरपायरेट्स्ची* गोष्ट सांगितली. ती संपतांच तो चोरनाईक ओरडून ह्मणाला; " सबूर! " मी थांबल्यावर त्यानें हुकूम सोडला कीं, "याला आत्तांच्या आत्त काळफत्तरावरून लोटून द्या "

मी भानावर येण्यापूर्वीच माझ्या जिवलग काढण्यांनीं मला चोहोंबाजूनीं घट्ट आलिंगन दिलें; तें त्यांनीं बरोबर काळफत्तरावरच सोडलें. माझ्याबरोबर चार भिल्ल व एक तेवता टेंभा मात्र होता. मला काळफतरावर उभे

*टीपः—ज्यूलियस सीझरला एकदां कांहीं चाच्यांनीं पकडलें होतें. पण तो त्यांनां आपली किंमत देऊन आपली सुटका करण्यास तयार तर झाला नाहीच; पण त्यानें " मी तुमच्यावर लवकरच स्वारी करीन व तुह्मां सर्वांस ठार मारीन ; " अशी नुसती दरडावणीच दिली नाहीं ; पण खरोखरच तसें केलें.

केलें असून, माझ्या फक्त कमरेची काढणी एका लोखंडी गजाला बांधलें होती. तेवढी सोडली कीं, वाऱ्याच्या झोंकासरशीं हा ब्राह्मण देवानिंदेचें पापक्षालन ह्मणून, खालच्या भीषण दरींत अंगांग वेगळें होऊन, घोरत पडणार होता! अरेरे!! काय ही स्थिति! समोर माझा वंशप्रांत म्हणजे सार नाशीक जिल्हा पसरला होता; व मागें माझें जन्मस्थल म्हणजे खानदेश जिल्हा होता. पण त्यांपैकीं एकालाही माझें संरक्षण त्यावेळीं करतां येईना-झालें. एका भिलानें गजाला हात लाविला—

" आयायायाया! " मला ऐकूं आलें. मागें वळून पाहातांच एक भिल खड कावरच तडफडून मरत होता; व दुसरा विवराकडे धूम पळत होता; असें मला दिसलें. एका काळ्या शार नागानें माझ्या जवळच्या गजाला वेटाळा दिला होता. तो आपली ती दोन वितांची फणा वाऱ्यांत हलवित होता ! माझ्या अंगाला देखील ती मधून मधून लागे. खोटें बोलण्यांत हंशील नाहीं; मी भ्यालों. ; व माझें शरीर केवळ काढणीमुळेंच फत्तरावर टांगतें राहिलें!

मी पुन्हां भानावर आलों तेव्हा मी विवरांतील भिलसभेतच असल्याचें मला दिसलें. मला तो चोरनाईक म्हणाला; " आपण कोणी थोर पुरुष आहांत यांत शंका नाहीं. आपली काढणी देखील तुटली होती. पण त्या नागानें तुमच्या काढणीच्या मेखलेंतून विळखा घालून तुम्हांला वांचविलें. आज भादव्याची अमावास्या; ह्मणून आमची वर्षारंभींची ही देवपूजा; आता आम्हीं दरवडा घालण्यास जाणार ; आपण देवपुरुष आहांत; आह्मांला यश येईल काय ?"

" मी सांगतों तसें वागाल तर, यश येईल. "

चोर-नाईकानें शपथ घेऊन माझ्या गुरुमंत्राप्रमाणें करण्याचें वचन दिलें. मी त्यास उपदेश केला.; व तेथून आपल्या बिऱ्हाडीं आलों. तो उपदेश कोणता, हें जाणण्याची वाचकांनीं मुळींच चवकशी करूं नये.

कारण या गोष्टीचा प्रत्येक वाचक जरी चोर असला, तरी त्याच्या चोरीचा मासला वेगळाच आहे. चोरनाइकाला केलेला उपदेश त्याला मुळींच उपयोगी पडणार नाहीं. पाहिजे असल्यास परीक्षा घ्या. तुंगीच्या एक खोल विवरांत तो चोरनाईक अजून आहे. त्याला भेटा, त्याच्याशीं बोला त्याची परीक्षा करा, म्हणजे श्रेष्ठ कोण? आपण कां तो? हें तुमचें तुह्मांला कळेल. माझी तर खात्री होऊन चुकली कीं, **नारदापेक्षां वाल्मीकिच श्रेष्ठ** !

---



# केशवसुतांची तारा

" अहाहा! किती सुरेख हें स्थळ ! इथें बसून केशवसुत तासचे तास खचित खचित घालवीत असावेत. गिरणाबाई ! धन्य तुमची !! "

एक नवखा मनुष्य हे उद्गार काढित असतांना, जवळच खेळत असलेल्या काहीं पोरांची एक विटी अचानक त्याच्या मांडीवर येऊन आदळली. त्याला ती फारशी लागली नाहीं. पण त्या छोट्याशा अपघातानें त्याची समाधी उतरली खरी. तो आसपास पाहूं लागला. त्याला तीं पोरें घोळका करून आपणांकडे पाहत आहेत असें दिसलें. हा देखील एक विलक्षण योगायोगच, असें वाटून, त्यानें त्या मुलांनां प्रेमळपणानें बोलावलें. एकदां केशवसुत याच ठिकाणीं असेच सायंकाळचे ध्यानमग्न असतांना ,उडत्या पक्ष्यानें त्यांच्या मांडीवर कच्चा आंबा टाकल्याची दंतकथा त्या नवख्याला माहित होती. तेव्हां आंबा नाहीं तरी आंब्याच्या लांकडाची तरी ही विटी असेल, व हिच्या सहाय्यानें आपण आपलें अतीव महत्त्वाचें कार्य खात्रीनें करूं असें त्याला वाटलें; व त्या आशेनें त्यानें त्या खेळाडूंनां जवळ बोलाविलें. त्यांनांही आपली विटी परत मिळेल अशी आशा वाटूं लागली. ते त्याच्याजवळ जमावानें गेले.

" मुलांनां ! " त्या नवख्यानें विचारलें " हें भडगांवच ना ? "

" हो ! "

" इथें इंग्रजी शाळा आहे ना ? "

" आहे. "

" त्या शाळेंत तीस वर्षांपूर्वी केशवसुत नांवाचे कवि मास्तर होते. त्यांची तुम्हांला माहिती आहे कां ? तुह्मी हसूं नका. तुह्मी सगळे लहान आहांत हें मी जाणतों. पण तुमच्या वाडवडिलांकडून तुह्मांला कधीं कळलें असेल ना?"

एकाही मुलाला माहिती नव्हती. पण एक मुलगा जरा चाणाक्ष होता;

तो म्हणाला; " आपण आमच्या हेडमास्तरांनां भेटा कीं. "

" तें तर मी करणारच आहे. पण हेडमास्तर तरी इथलेच राहणारे आहेत कां ? "

कर्मधर्मसंयोगानें हेडमास्तरांचीच स्वारी तेथें आली. आपल्या मुलांचा घोळका तेथें कशाला जमला, हें पाहण्याकरतां ते व त्यांचे दोन स्नेही असे तेथें आले. त्यांना घोळक्याचें मुख्य कारण समजतांच हेडमास्तरांनीं त्यांस तेथून जाण्याची आज्ञा केली. एका मुलानें नवख्याला विटीची आठवण करून दिली. ती हातांत धरून नवख्यानें विचारलें कीं, " ही कोणत्या झाडाची केली आहे ? "

" आंब्याच्या. " विटीच्या धन्यानें उत्तर दिलें.

" मग मला ही बक्षिस देतोस कां? "

" या विटींत विशेष काय आहे ? " हेडमास्तरांनीं विचारलें.

" मला अगोदर असें सांगा कीं, तें आंब्याचें झाड नक्की कोणतें ? " नवख्यानें उलट विचारलें.

" तें नक्की कसें सांगतां येईल ? "

" मी सांगतों. " विटीचा मालक म्हणाला. " तें पहा! तें झाड. मी कालच त्याची एक वाळलेली फांदी तोडिली व तिची विटी केली. "

नवख्यानें उठून तें झाड गांठलें. त्याच्या मागें सारा घोळका जाऊं लागला; पण विटीबद्दल स्वतः ओलीस राहून हेडमास्तरांनीं मुलांनां वाटी ला  दिलें, व आपल्या दोन सोबत्यांसमवेत नवख्याची सोबत केली.

" हें झाड कोणाचें ? " नवख्यानें विचारलें. हेडमास्तरांनां माहित नव्हतें. पण एका सोबत्यानें सांगितलें कीं, " एका नायकिणीचें. " तें ऐकतांच नवख्याचें तोंड खरकन् उतरलें. पण त्यानें धीर करून आणखी विचारलें कीं, " तिचें नांव काय ? "

" तिचें नांव तारा."

" तारा ! " नवख्याला विजेचा धक्का बसला. इतके झाल्यावर

मात्र त्याला त्या गांवच्या लोकांची जिज्ञासा तृप्त करावी लागली. तरी त्यानें सगळेंच सांगितलें नाहीं; व जें थोडें सांगितलें तेंही अशा बेतानें कीं, त्यांच्यापासून केशवसुतांची कांहीं जादा माहिती मिळाल्यास पहावें. त्याला जास्त अशी कांहींच माहिती मिळाली नाहीं. पण विटी मात्र मिळाली; व हेडमास्तरांचें आमंत्रणही मिळालें; तें मात्र त्यानें आभारपूर्वक नाकारलें, पण परत जातांना भेटून जाण्याचें वचन मात्र त्याला द्यावें लागलें.

नवख्यानें रात्रीं ११ च्या सुमाराला तारा नायकिणीच्या घराच्या शोध लाविला. त्या माडींत सारंगीचा जलसा चालला होता. समोरच्या घराला ओटा होता. ताबडतोब त्याला केशवसुताच्या " सतारी " ची आठवण झाली. आणि ती कविता त्या कविश्रेष्ठानें कोठेंही रचिलेली असो; तिचें स्फूर्तिस्थल खचित येथलेंच असलें पाहिजे अशी त्याची खात्री झाली. त्यानें त्या ओट्याचा आश्रय घेतला. त्याचें लक्ष गाण्याकडे मुळींच नसून तो माडीवर जावें कीं नाहीं, गेल्यास कसें जावें, तेथें हेडमास्तर असतील कां— या शेवटच्या विचारानें त्याला हसूं आलें. कारण तो स्वतः कवि नसला तरी धंद्यानें मास्तर होता; व मनानें रसिक असला तरी तो नायकिणीच्या घरांत आजपर्यंत कधींच गेला नव्हता. तथापि केशवसुत मास्तर, रसिक व कवि असले तरी, त्यांची काव्याधिष्ठात्री तारा, एक नायकीण असावी हा शोध त्याच्या मनाला लागणारा होता. पण तो शोध तरी खरा होता काय ? तेंच पाहण्याकरतां त्याला माडीवर जावयाचें होतें. पण गाणें संपून मंडळी निघून जाईपर्यंत त्याची तसें करण्याची छाती होईना. अखेरीस गाणें संपलें; मंडळी घरोघर गेलीं; व त्या घराचा दरवाजा बंद होण्याची वेळ आली. तशी नवख्यानें एकच उडी मारून तें दार गांठलें.

" तारा नायकिणीचा हाच वाडा काय ? "

" हो. " चाकरानें दारांतूनच म्हटलें.

" मला त्यांच्याशीं काम आहे. "

त्या नवऱ्यांत सारेंच वातावरण बावळटपणाचें होतें. तें पाहून चाक रानें ' उद्या दुपारीं या ' असें ह्मणून त्याच्यासमोर दरवाजा लावून घेतल नवऱ्याची निराशा झाली. तरी तो त्या गल्लींत घुटमळत राहिला. शेव तो गिरणेच्या रस्त्याला लागला. पण इतक्यांत त्याच्या खांद्यावर को हात ठेविला. " कोण " नवऱ्यानें घाबरून विचारलें.

" मी तारा ! घाबरूं नका. चला माझ्या घरीं. "

तीं दोघें माडींत निवांतपणें बसल्यावर नवऱ्यानें आपलें कार्य ति मनमोकळेपणानें सांगितलें. ती त्याला मग म्हणाली; " मला आपणां उपयोगी पडेल असें कांहींच सांगतां येणार नाहीं. तथापि माझ्या आई माहित असेल. आपण इथेंच बसा. मी तिलाच इथें पाठवितें. "

थोड्या वेळानें तिची म्हातारी आई एकटी दिवाणखान्यांत आली. ह्मणाली; " आपण मागतां ते मास्तर मला चांगले आठवतात. ते अत्यं एकलकोंडे असत. त्यांचें आचरण फारच शुद्ध होतें. एकदा एका कव बरोबर त्यांचे पाचोरे स्टेशनवर बोलणें झालें. "

" विनायकराव करंदीकर ना ? "

" हो. तेच. त्यांना मी ओळखत होतें. त्यांनीं आपलें संभाषण म सांगितलें. तें मला आतां सगळें आठवत नाहीं. पण कवींनीं आप प्रेम शुद्ध ठेवावें; त्याला शरीराची घाण लागूं देऊं नये, असें कुशाभा ह्मणत होते. "

" आणि विनायकराव ? "

" त्यांचें म्हणणें कीं, कवींनीं आपलें चारित्र्य व आपलें काव्य यांत संब ठेऊं नये. चारित्र्य अपवित्र असलें तरी त्यामुळें कवीचें काव्य पवित्र रा ण्यास हरकत नाहीं."

" आणखी कांहीं ?"

" विनायकांनीं कुशाभाऊंना दोष दिला कीं, त्यांची कविता आत्मीयतेच

आहे. ते ह्मणाले कीं, आज तुमचें चरित्र निर्मळ आहे, ह्मणून तुमची कविता समाजाला घातक होत नाहीं. परंतु तुमच्या संप्रदायाचे भावी कवि जर कां अपवित्र आचरण काव्यांत आणूं लागले तर समाज बिथरून जाईल— असा एकादा कवि हल्लीं आहे का हो ? ”

“ मला माहित नाहीं. पण माझा मूळ मुद्दा राहिलाच. केशवसुतांची काव्याधिष्ठात्री तारा कोण ? ”

“ माझ्या मुलीचें नांव तारा असलें तरी ती, अथवा कोणतीही स्त्री त्यांची अधिष्ठात्री असेल, असें ह्मणण्यास आधार काय ? ”

“ आपणांकडे कधीं केशवसुत आले होते कां ?”

“ चुकून नाहीं. पण...

“ थांबू नका. सांगा कीं ! ”

“ माझ्या लहान तारेकडे पाहून त्यांना वात्सल्य उत्पन्न होत असलें पाहिजे.”

“ आपलें नांव ? ”

“ सारजा. ”

“ आपलें वय त्या वेळीं किती वर्षांचें असेल ? ”

“ मी विनायकरावांपेक्षां थोडी मोठीच. ”

“ म्हातारी ! ” नवखा उद्गारला ! पण चटकन् म्हणाला—

“ क्षमा करा अं ! मला केशवसुतांच्या त्या कवितेची आठवण झाली; आपण त्यांच्या कविता वाचतां काय ? ”

“ नाहीं. मला एकदोन वाचायला मिळाल्या. त्या मला आवडल्या नाहींत. मला विनायकरावांच्या लावण्या भारी आवडतात. ”

“ कांहीं ह्मणाल काय ? ”

“ उद्यां. ”

“ ठीक आहे ! आतां मी आपणांस “ ह्मातारी ”ह्मणून दाखवितों.”

त्याप्रमाणें त्या नवख्यानें ती कविता म्हटली; व विचारिलें कीं,

" कशी आहे?"

" मला मुळींच समजली नाहीं. "

" यांतल्या मुलीचा उल्लेख आपल्या तारेचा असेल काय ? "

" असेल कदाचित्! पण त्यांनांही मुली होत्या. "

" होत्या नाहीं; आहेत; असो. आतां स्पष्टच विचारतों कीं, केशवसुतांच्या कवितांत जेथें जेथें तारा व तारका, असा उल्लेख आहे तेथें तेथें आपल्या तारेचा कांहीं संबंध आहे कां? अर्थातच वात्सल्याचा. "

" असावा. कारण ते अत्यंत घुमे असले तरी, माझ्या तारेकडे पाहून त्यांची कळी उमलावी! "

" मनोहारिणी! "नवखा उद्गारला. पण त्याला पुन्हां त्या उद्गाराचें स्पष्टीकरण करावें लागलें. बराच वेळ जाऊं देऊन, " केशवसुत आपल्या आंबराईत वसत असत कां?" असा त्यानें प्रश्न केला. व " होते " असा जबाब मिळाल्यावर त्यानीं विटिची गोष्ट सांगितली. ती ऐकून त्या म्हातारीनें त्या आंब्याच्या ताज्या कोयी त्यांनां देऊन आपल्या देशीं फिरण्यास सांगितलें व विटी परत घेतली. थोड्या वेळांत नवख्यानें रजा घेतली. त्याची पक्की खात्री झाली कीं, केशवसुतांची तारा मूर्तिमंत स्त्री असून, तिनें वात्सल्याच्या स्फूर्तीनें कवीची कविता पवित्र केली आहे.

\+ \+ \+ \+

हा अपूर्व शोध लावणारा नवखा मला आगगाडींत भेटला व माझें नांव समजल्यावर त्यानें आपला अपूर्व शोध मला सांगितला; व मला माझें मत विचारलें. मी ह्मटलें, " मला क्षमा करा! पण कवींनां वेडे ह्मणणारे रसिकच जास्त वेडे असतात खरे! त्यांतल्या त्यांत संशोधकांचें वेड तर विचारूंच नका; केशवसुतांच्या कवितांतून एकच कां विशेषनाम आहे ? आणि तारा हें विशेषनामच कां घेऊन चालतां? आपण अगोदरच मनाशीं एक गांठ बांधावयाची व तिच्या अनुरोधानें सारा पुरावा पहावयाचा, हा न्याय कोठला ! बरें; तारा ही एक बाई अथवा मुलगी आहे असें समजलें तरी

ती भडगांवची व तीच तारा कशावरून ? कवीच्या आतेष्टांत एखादी तारा कशावरून नसेल? " तर माझी सोनी । पाहुनी ये गे परतोनी ॥ " या चरणांतली सोनी हें तुम्हीं विशेषनाम कां घेत नाहीं ? " तिच्या कुंतलावरणाखालीं । तारका कुणी काय पहुडली? " यांत तारका ह्मणजे भडगांवची तारा व तिची परिस्थिति, हा कितीसा सरळ अर्थ आहे !"

" पण केशवसुतांचा अर्थ नेहमींच कोठें सरळ असतो? "

" ते मिस्टिक पोएट आहेत; नाहीं कां ?" मी टोला मारिला. "क्षमा करा; पण केशवसुतांचा मिस्टिसिझम वेगळाच आहे. एखादी व्यक्ति त्यांच्या नेत्रांपुढें होती असें कल्पून तो गूढार्थ उकलणारा नव्हे; आणि गूढार्थ भावनांचा कीं भावनास्थलांचा ? "

" मग आपलें म्हणणें तरी काय? केशवसुतांची तारा होती कीं, नव्हती!"

" तारा ह्मणजे हृदयाची तळमळ, अथवा तिचा क्षणभर विसर पाडणारी काव्यस्फूर्ति असा अर्थ घ्याल तर ध्येय व ध्येयसृष्टि अशी तारा होती. शरीरधारी तारा नव्हती. अथवा एकच नसून अनेक तारा होत्या. लहान होत्या मोठ्या होत्या. अमूर्त होत्या; मूर्तही होत्या. त्या त्यांच्या स्त्रिया होत्या; मुलीही होत्या. थोडक्यांत त्या त्यांची ध्येयसृष्टि व ध्येय देखील होत्या."

काय झालें कोणास माहित! माझें ह्मणणें ऐकून तो नवखा मोठ्यानें हसला. " व मी शोधाची थाप मारली हो ! " असें ह्मणाला. नाहीं तरी शोधक दुसरें काय करतात !



# पत्ता लावणाऱ्यास साम्राज्य बक्षिस !!!

वसंतांतले शुभ्र चांदणे पडलें होतें. माझ्या मुळच्याच स्वच्छंदी मनाला जास्त स्वच्छंदी करणारा शीतळ वारा, त्या पर्वतशृंगावर वाहत होता. सडक सोडून मी आतां मध्यरात्रीपर्यंत, नाहीं तरी चार पांच शिखरें पालथीं घालून, या अत्युच्च शृंगावरील, एका दाट पालवीच्या कदम्बावर विश्रांतिकरितां, हातपाय पसरून, आडवा झालों होतों. आकाशाकडे पहात व विचार करीत असतां, निद्रादेवीचा शालू माझ्या नेत्रांवर हळूं हळूं पडत होता. ती एक प्रकारची Day dream चीच अवस्था होती.

इतक्यांत त्या शिखराच्या सपाट माथ्यावर मला पाण्याच्या लाटांचा आवाज ऐकूं आला. स्वाभाविकपणेंच माझे डोळे तिकडें वळले. मला जे दिसलें तें फारच चित्ताल्हादक चित्र होतें. पण तें पाहून मला अतोनात आश्चर्य वाटलें

कारण त्या स्थळीं वारकेंसें वाळलेलें पिवळें गवत, धोंड्याशा शिळा, पांचपंधरा झुडपें, व माझा कदंब वृक्ष यांखेरीज मला गेल्या तासभर, कांहींच दिसलें नव्हतें. मग आतां तेथें एकाएकीं जलकुंड तयार कसें झालें? आणि त्याच्या कांठीं तो वृद्ध तपस्वी केव्हां व कसा आला?

तो ध्यानमग्न होता, तोंपर्यंत मी मुळींच हालचाल केली नाहीं. पण ती वेळ फारशी मोठी नव्हती. त्याची समाधि लागेना हें अगदीं उघड होतें. त्यानें आपल्या जागा वारंवार बदलल्या, पण त्याची नित्याची समाधी लागेना; म्हणून तो जरा बावरल्यासारखा दिसला. त्यानें आसपास निरखून पाहिलें. तपस्व्याची दृष्टी ती; तींतून मी निसटणें शक्यच नव्हतें. त्यानें थोडावेळ ध्यानस्थ बसून म्हटलें ;

“ मित्रा ! तुला त्रास होत नसेल तर इथें थोडा वेळ येऊन बसशील कां!”

तो शत्रु असता तरी कुतूहलबुद्धीनें मी त्याजजवळ गेलों असतों: मग इतक्या प्रेमळ वाणीनें त्यानें पाचारल्यावर मी झाड उतरून त्याच्याकडे न जाणें शक्यच नव्हतें. एका साधूच्या संगतींत ही रात्र जाणार याचा मला आनंद वाटू लागला. क्षणभर माझ्याकडे पाहून तो मला म्हणाला; " हल्लीं आमच्या देशाची कशी काय स्थिति आहे ?"

मी खचित सांगतों कीं, या प्रश्नामुळें मला तो तपस्वी शत्रुपेक्षांही; भयंकर भासला.! कारण तो तसा प्रश्न पहिल्या सटक्यासरशीं करील, अशी माझी मुळींच कल्पना नव्हती. [illegible] वेश, त्याची वृत्ति, तें स्थळ [illegible] वेळा वगैरे सर्व कांहीं चिदानंद स्वरूपी. रमण्याचीं होतीं शिवाय हा पुरुष सरकारचा गुप्त हेर कशावरून नसेल, अशीही मला शंका आली. एकवार शत्रु पुरवला, पण हे असे हेर नकोत, अशी माझी निरीक्षणोत्पन्न भावना होती. माझ्या देशांतील या हेरांच्या संस्थेचा किळस वाटून-देखील मी सृष्टीशीं बोलण्याकारितां असा रात्रिंचर झालों होतो. [illegible] येथेंही तेंच! मला स्वतःला या हेरांपासून अजून त्रास होत नसला तरी, यांच्यामुळें राजा व प्रजा यांत गैरसमज उत्पन्न होऊन, जगाचें नुकसान होत आहे; इंग्लंड व हिंदुस्थान यांची मैत्री सर्व जगाला सुखकारक, तसेंच त्यांचें वैर सर्वांनां तापदायक होतें, अशी माझी खात्री आहे; असो. मी म्हणणार होतों

आपल्या देशाच्या दुर्दैवानें आपणांला इतकें कां दुःख वाटतें? आपली कांहीं वेगळीच अपेक्षा होती कां?

पण मी माझी चित्तवृत्ति मनांतच रोधून ठेविली. मी माझी वाटेल ती भावना दाखवीन; पण आश्चर्य कधीही दाखवित नाहीं. मी त्या तपस्व्याला उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं, पण काय मजा पहा ; माझीं तसलीं उत्तरें-सुद्धां त्याच्या मनावर परिणाम करतीं झालीं. त्यानें मला खूप खोदखोदून प्रश्न विचारावे. तितकी मीही स्पष्ट उत्तरांची टाळाटाळच करावी. तरी सुद्धां त्याला हव्या असलेल्या सूचना मजपासून मिळत असाव्या; व त्या त्याला मुळींच खचत नसाव्या असें दिसलें. कारण मी जर्मन वॉरची गोष्ट

उघडाउघडकरितां सांगितली तरी, ती त्याच्या हृदयीं भिनली. त्याचे उसासे सुरू झाले; व लवकरच त्याचे अंग थरथर कांपूं लागून, त्याच्या नेत्रांत रडें भरलें! शेवटीं शेवटीं तर त्याच्या त्या ज्वलजहाल दुःखाच्या आकळ्या मजकडून पहावेनात. मी पूर्वींचेच प्रश्न केले."

माझे हे प्रश्न ऐकून त्याला एकाएकीं इतका भयंकर त्वेष आला कीं, त्यानें पटकन उठून, आपल्या बाहूंनीं मला अधांतरीं उचललें; व माझ्यासुद्धां त्या कुंडांत उडी घेतली असावी. कारण मी बेशुद्ध होत चाललों होतों तरी, माझ्या कानांभोंवतीं पाण्याच्या लाटा मला ऐकूं आल्याचें स्मरतें!

मी पुन्हां शुद्धीवर आलों तों माझ्या बिछान्याजवळ तो वृद्ध तपस्वी व त्याची वृद्ध पत्नी उभी असल्याचें मला दिसलें. मला मुळींच इजा झाली नव्हती. तरी पण मी त्या तपस्व्यावर रागावलों होतों; पण माझ्याअगोदर त्यानेंच बोलण्यास आरंभ केला; "माझा तुला राग आला आहे. पण माझी कहाणी ऐक. कारण आजची ही रात्र आमची शेवटचीच आहे. सुमारें पन्नाससाठ वर्षांपूर्वी तुझ्यासारखाच मी त्या कदंबवृक्षावर बसलों असतां, त्याच तळ्यांतून नऊ सुंदर स्त्रिया बाहेर आल्या. त्यांनीं तेथें विहार केला; अरुणोदयापूर्वींच त्या कुंडांत शिरल्या; व पूर्ववत गवत उगवलें. मला आश्चर्य वाटलें; व फिरून दुसऱ्या रात्रीं तेथें जाण्याचा मी निश्चय केला; पण स्थळ चुकूं नये म्हणून, मी कदंबावर माझें उपरणें टांगून ठेवलें. दुसऱ्या रात्रीं मी तेथें जातांच माझें उपरणें मला सांपडलें नाहीं; पण त्या मुलींनीं मला तें परत दिलें; व आपल्या खेळांत मला सामील केलें; व त्यांची जाण्याची वेळ झाली, तशी त्यांनीं मला, आपल्याबरोबर जाण्याची विनंती केली. मी अत्यंत कुतूहलप्रिय तरुण ब्राह्मण होतों. मी रुकार दिला; व आम्ही सगळे इथें आलों."

"मग मला आपण दांडगाईनें कां आणलें. मीही मोठ्या आनंदानें आलों असतों." मी त्याला मध्येंच हटकून म्हटलें. "मी देखील कुतूहलप्रिय तरुण ब्राह्मण आहे. दांडगाईचें कारण नव्हतें."

" होतें. " तो ह्मणाला. " कसें ते लवकर समजेल. मला त्या मुलींनीं इथें आणल्यावर दुसऱ्या दिवशीं आपल्या वृद्ध पित्याजवळ नेलें. त्यानें मला, मी तुला विचारला, तोच प्रश्न केला. व मीही त्या वेळची परिस्थिति त्याला सांगितली. ती ऐकून त्यानें उसासा टाकला; व एकवार सभोंवतालीं दृष्टि फेकून, त्यानें आपल्या सर्व मुलींनां बोलाविलें; व त्यांनां ह्मटलें;

" मुलींनो ! ज्या कार्याकरता मी ही सारी तयारी केली, तें कार्य या या तयारीनें होईल, असा मुळींच भरंवसा नाहीं. तेव्हां मी आतां त्या दारूखान्यांच्या खोलींत जातों. पुढें काय करणार हें तुम्हांला सांगायलाच पाहिजे कां ? फडक्यांचें रक्त —

" फडके ! " मी [ तो तपस्वी ] उद्गारलों !

" हो ! मी फडके आहे ! एक फडके राष्ट्रस्वातंत्र्याकरतां बळी पडला. तरी पुरी तयारी करून, शत्रूंशीं रणसंग्राम करण्याची या त्याच्या भावानें कमर बांधिली. त्या कोठड्या शस्त्रांनीं भरलेल्या आहेत. त्या दारूगोळयांनीं भरलेल्या आहेत —

" आणि माणसें ? "

" माणसें ! नव्या दमाची नवीं माणसें मला हवी होतीं. ईश्वरानें मला या नऊ मुली दिल्या. त्यांचे पति मी इथें ठेवणार होतों. ते जावई, या मुली, व यांची प्रजा, यांनीं माझें कार्य पुढें चालवावें, अशी माझी इच्छा होती. पण तुम्ही सांगतां कीं, बोअर वॉरमध्यें इंग्रजांना जय मिळाला —

" पण बोअर वॉर तीस वर्षांपूर्वींची! तुह्मीं ह्मणतां पन्नास साठ वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे " मी ( निफाडकर ) म्हटलें " खरेंच " तपस्वी म्हणाला " आमच्या मार्गात आह्मांला काळाचें भानच राहत नाहीं. "

" तुमचा मार्ग कोणता? "

" पुढें ऐक! त्या फडक्यांनीं नंतर आपल्या सर्व मुलींनां त्या कोठडींत आपल्याबरोबर आत्मयज्ञ करण्याची आज्ञा केली! " " अरेरे! " मी ( निफाडकर ) उद्गारलों.

" मलाही असेंच दुःख झालें ! "

" पण मुलींच्या बलिदानानें काय साधलें ? फडके स्वतः गेले हें देखील बाइटच. पण तें एकवार मला समजतें. आपल्या ध्येयाचा चुराडा उडाल्यावर त्यांच्या सारखीं माणसें जगांत राहण्यास नाखुष असतात. पण मुलींना मारून त्यांनीं काय साधलें ? "

" आत्मसमाधान! फडक्यांचें रक्त त्यांनां मागें ठेवावयाचें नव्हतें. खरें सांगू कां? तपस्व्याची मनोभूमिका तुह्मांला कळतच नाहीं; असो. माझें म्हणणें फडक्यांनीं ऐकून घेतलें नाहीं खरें! "

" तुमचें काय ह्मणणें होतें ?" मी ( निफाडकर ) विचारिलें.

" माझें ह्मणणें फार मोठें होतें. "

" थोडक्यांत ?"

" हिंदुस्थानला शस्त्रास्त्रांनींच स्वातंत्र्य मिळेल. पण तें प्रचंड शास्त्रीय शोधानें मिळेल. माझें हें ह्मणणं फडक्यांच्या बुद्धीला पटण्यासारखें नव्हतें. व त्यांनीं अखेरीस आपल्या सर्व कुटुंबाचें त्या कोटडींत बलिदान केलेंच. त्या स्फोटानें एक झरा फुटला; व तोच त्या कुंडांतून वाहतो. त्या कुंडावरली गवती शिळा सरकती आहे. ती फडक्यांची कारागिरी आहे. मुला, इथून बाहेर पडण्याचा मार्ग तो तसा आहे. तू त्या वाटेनें जा. "

" मग मला हें सांगण्याकरतां इथेंच कशाला आणिलेंत? कुंडावरच नसतें कां सांगतां आलें ? " मी विचारिलें.

" सांगतों. त्या मुलींपैकीं एकीला माझें ह्मणणें पटलें होतें. तरी पण तिनेंही आत्मयज्ञ करण्यास माघार घेतली नाहीं. ईश्वराच्या मनांत फडक्यांचें रक्त महाराष्ट्रांत ठेवावयाचें होतें; ह्मणून ती मुलगी त्या स्फोटांतूनही वांचली. ती ही माझी पत्नी. आम्हीं आतांपर्यंत इथेंच दिवस घालविले. आम्हांला एक मुलगा आहे. पण त्याची वृत्ति साधूची आहे. आजोबाच्या बरोबर विरुद्ध तो निघाला आहे. हिंदुस्थानानें सर्व जगाला मानव्यप्रेम शिकवून, शास्त्रीय

शोधानें इतर ग्रहांवर जाऊन, इष्ट असल्यास तेथें आपली युद्धाची रग शमवावी, असें त्याचें ह्मणणें आहे. माझे शास्त्रीय शोध संहारक आहेत.—
" आहेत ! " मी आनंदानें विचारलें.
" काय उपयोग? तूं जर्मनवॉरचें वर्णन केलेंस; तेव्हां त्या मानानें माझे शोध कांहींच नाहीत."
" आज नाहींत; पुढें होतील. पण मला दाखवाल काय?"
" दाखवतों! पण तूं इथेंच थांब! "
असें म्हणून तो व त्याची पत्नी एका अंधेऱ्या गुहेंत गेली. पांच मिनिटांनीं एक स्फोट झाला. ती गुहा संबंध उलथून पडली. शिखरालाही भोंक पडलें. मी तर झांबूनच पडलों. शुद्धीवर आलों तेव्हां, एका नदीच्या कांठीं एक तरुण मुलगा माझ्याजवळ बसलेला दिसला. त्यानें सांगितलें.-
" मीच त्या तपस्व्याचा मुलगा. आमच्यासारखीं अशीं कैक कुटुंबें हिंदुस्थानच्या पवित्र संदेशाखातर बळी पडतील खरीं!"
" तो पवित्र संदेश कोणता ? "
" राजकीय साम्राज्यसत्ता ही मानवांची जुनी संस्था आहे, तिचा हिंदुस्थाननें हजारों वर्षें उपभोग घेतला आहे. त्या सत्तेपायीं सगळीं साम्राज्यें धुळीस मिळतातच मिळतात. पण हिंदुसाम्राज्य नष्ट झालें तरी हिंदुसंस्कृति नष्ट झाली नाहीं. कारण तिच्या करवींच मनुष्यांचें संस्कृतिसाम्राज्याचें नवें तत्व ईश्वर अमलांत आणणार !"
" संस्कृतिसाम्राज्यांत राजकीय सत्ता येत नाहीं कां? "
" राजकीय सत्ता हा शब्दच खोटा. संस्कृतिसत्तेपुढें राजकारण हें अगदीं खुलें खुलें होतें. आत्मिक बल हेंच एक बल! "
" व्यक्तीचें कीं राष्ट्राचें ? "
" मनुष्यजातीचें. व्यक्ति, राष्ट्र, खंड, जाति, धर्म सगळे कांहीं आत्मीय भावनेंत तेजस्वी होतें."
" अशी स्थिति किति हजार वर्षांनीं येणार? "

" भयंकर रणसंग्रामांनीं क्रोडों माणसांचा चुराडा झाल्यानंतर !"
" त्यांत आह्मी हिंदुही मरूं! "
" हो ! मराल !! पण माणसें म्हणजे संस्कृति नाहीं. संस्कृति राहील."
" संस्कृति ह्मणजे काय ? "
" संकृति म्हणजे संस्कारसार! "

संस्कृति शब्दाची इतकी सुटसुटीत आणि सुंदर व्याख्या माझ्या ऐकण्यांत अझून आली नव्हती. ' संकृति ह्मणजे संस्कारसार ' हे तीनच शब्द; पण त्यांनीं माझ्यापुढें मानव जातीचा सगळा इतिहास पसरवून दिला ! मानवांच्या उत्पत्तीपासून मानवेतर प्राण्यांशीं त्यांच्या लढाया झाल्या, व नंतर मानव एकमेकांतच भांडावयास लागले; अशा युद्धप्रवृत्तीतूनच त्यांचें अंतःस्वरूप उत्क्रांत होऊन, तो इतर ग्रहांनांही आपल्या अंतःकरण कक्षेंत, क्वचित क्वचित नेणार असा मला विश्वास वाटूं लागला. त्याचप्रमाणें जगडव्याळ उत्क्रांति एका पिढींत व्हावी, अशी माझी इच्छा किती वेडगळपणाची होती, हें ही मला पटलें. व्यक्तीचा मोक्ष या संज्ञेच्याऐवजीं निदान मानवमोक्ष ही संज्ञा कां अमलांत येऊं नये? अशी मला सदिच्छा स्फुरूं लागली ; व तिचा जो जनक तो तरुण तपस्वी पुत्र, त्याच्याकडें पहाण्यास मी आपले डोळे वर केले. पण तो होता कुठें ?

तो तेथून चालता झाला होता. कोठें ? कोणास माहित ? त्याचा पत्ता जो लावून देईल त्याला एक मोठें साम्राज्य बक्षीस!!!



# भुतांबरोबर चहापान !

" फट "

आमची टूरिंग कार चांदवडच्या घारींत, चढत असतां, देवीच्या देवळापाशींच बर्स्ट झाली! बरें तर बरें, ती रात्र चांदण्याची होती; नाहीं तर अंधेऱ्या रात्रीं एक वाजतां आम्हांला किती तरी त्रास झाला असता. ते दिवस उन्हाळ्याच्या तोंडचे होते; त्यामुळें घारींत वारा वाहत असला तरी आह्मां चौघां वाटसरूंनां खालीं उतरून मजेनें स्मोकिंग करण्यास हरकत वाटली नाहीं. शॉफर दुसरी ट्यूब बसवीत होता.
आमच्या गप्पा चालल्या होत्या. मुख्य विषय माझ्या " हॅम्लेट " नाटकावरील विरुद्ध टीकचा होता. हॅम्लेटचा प्लॉट शेक्सपियरचा नाहीं; नाट्यरचनेंतही त्यांचें स्वतःचें कसब फारच थोडें; तेंही चुकीचें; त्यांतील खुद्द हॅम्लेचेंच पात्र अगदीं कुच कामाचें झालें आहे; कला नाहीं; मनुष्य स्वभावाची पारख नाहीं; मानस शास्त्राचें ज्ञान नाहीं; भुतांखेतांचें पूर्ण ज्ञान नाहीं; त्यांतील तत्वज्ञान तर अगदींच टाकाऊ; वगैरे माझ्या मुद्यांवर माझे स्नेही टीका करीत होते; व त्यांनां मी समजावून सांगत होतों. "इतक्यांत ओ माय् गॉड्! असें "माझा पार्शी मित्र ओरडला. पण त्याचा आवाज चेपलेल्या गळ्यांतून निघाला असें भासलें. " का हो? काय झालें? " आह्मीं सर्वांनीं विचारिलें.

पण त्यानें आह्मांस उत्तर देण्याच्या अगोदर, एक पांढरा शुभ्र घोडेस्वार, पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसून, समोरच्या डोंगरावरून उड्या घेतच आमच्याकडें येतांना आह्मांला दिसला. तो सडकेला लागतांच त्यानें एकदम आपला घोडा थांबवला; व क्षणभर आमच्यांपैकीं प्रत्येकाकडें निरखून पाहून त्यानें आपला घोडा चांदवडकडें उतरवला. तो वळणाच्या आड होतांच मी विचारिलें;

" कोण असेल हो? "

" अहो ! भूत!" पार्शी मला बिलगून म्हणाला. " इथें देवीच्या पुजाऱ्याच्या खून झालेला तुम्हांला माहित नाहीं कां? "

" पण तो पुजाऱ्याच्या पोशाखांत नव्हता. "

" नसेल. भूतांना काय—बापरे! पुन्हां आलाच कीं ! "

" तो स्वार खरोखरच घाट चढून आमच्यांपर्यंत आला. अगदीं सावकाश आला; आणि त्यानें फिरून आमच्यांकडे निरखून पाहून, मला आपल्याबरोबर चलण्याची खूण केली. मी ती ओळखून म्हटलें,

" मी येतों. पण तूं कोण आहेस हें अगोदर सांग. हें पहा, मी तुला स्पष्ट सांगतों कीं, भुतांखेतांचें ते शेक्सपियरच्या हॅम्लेटचे दिवस आतां संपले! "

माझें म्हणणें ऐकून तो घोडेस्वार गंभीरपणा न सोडतां किंचित हंसला. मात्र त्यानें आपलें मला बोलावणें कांहीं सोडलें नाहीं. मग मात्र मला केवळ कुतूहलबुद्धीनेंच त्याच्या मागें जावेंसें वाटलें. मी म्हटलें " चला !"

" मि. निफाडकर, जाऊं नका ! " पार्शी स्नेही कुजबुजला.

" बघूं तर खरी मजा. "

" निदान त्याला आपलें नांव तरी सांगूं द्या.

" जाऊं द्या हो. मला कोण काय करतो ? मजवळ नाहीं पैसा, कीं हा मला भूलवून मजवर दरोडा घालील. मी नाहीं देशद्रोही कीं राजद्रोही अथवा मित्रद्रोही. मला कोणापासूनही भय नाहीं. माझा भुतांखेतांवर, लिहिण्याच्या कलेपेक्षां, जास्त असा भरंवसा नाहीं.—"

काय असेल असो. माझें भाषण ऐकतांच तो घोडेस्वार रागानें ओरडला. त्याच्या घोड्यानेंही खिंकाळून आकाश दणदणून दिलें. खालीं देवीच्या गाभ्यांतून व पलीकडल्या साऱ्या पहाडांतून प्रतिध्वनि घुमूं लागले. पार्शी तर भीतीनें मटकन् खालीं बसलाच. पण आम्हीं सारे घाबरलों. भयाची भावना संसर्गजन्य असते. मी देखील घाबरलों खरा. पुढें त्या स्वारानें

मला पटकन् उचलून आपल्या घोड्यावर आडवें टाकलें; माझ्या पोटा-वरून आपला पाय आडवा टाकला; डाव्या हातानें माझी लोंबती मान तोलून धरीली; व आपला घोडा भरधांव फेकला. अनेक दऱ्या ओलांडून झाल्यावर घोडा एक शिखर चढूं लागला. शिखरावर पोंचतांच घोडेस्वार खालीं उतरला. मीही उडी मारून त्याच्यासमोर उभा राहिलों. घोडा नुसता उभा होता. थोड्या वेळानें मला स्वारानें विचारिलें;

" मला ओळखिलें ?"

" कसें ओळखणार? "

" मी सातशें वर्षांपासून भूतयोनींत खिचपत पडलों आहे. "

" असाल. त्याला मी काय करूं ?"

" माझा उद्धार कर."

" पण तुह्मीं आहांत तरी कोण? "

" हॅम्लेटचा बाप. "

" तुमच्या मुलानें तर तुमच्या भावावर तुमचा सूड उगवलाच आहे."

" कोण म्हणतो ?"

" शेक्सपियर. "

" गाढव तो शेक्सपियर व गाढव सारे तुम्हीं कवि. असत्याला सत्त्वाचें रूप देतां ; व माझ्यासारख्या जीवाला त्या नरकयातनेंत शतकोंनुशतकें वर्षें खिचपत पडूं देतां."

" असेल कदाचित् शेक्सपियरची चूक ती. पण त्यानें किंवा त्याचें नाटक पाहणारांनीं तुमचा उद्धार करणें शक्य नव्हतें. माझा तर आपल्याशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं. शिवाय आतां सूड घ्यायचा तरी कोणावर? अथवा फार गमजा तरी कशाला? तुह्मीं मुळीं भूत नव्हतच. "

मी असें ह्मणतांच त्या घोडेस्वाराच्या ठिकाणीं एकदम जाळ झाला. व घोड्याचाही एकदम जाळ झाला. पण त्या स्वाराची पडशी व कमंडलु मात्र तशींच राहिलीं. मी आपला तो कमंडलु जवळच्या कुंडांतून भरून आणून त्या

जाळावर ठेवून दिला; व म्हटलें, "काय करावें? चहाचें साहित्य नाहीं; नाहीं तर चहाच केला असता; बाकीं हे हॅम्लेटच्या नरकांतल्या वाफा!—

एकदम किंकाळ्यावर किंकाळ्या व खिंकाळण्यावर खिंकाळणें ऐकूं येऊं लागलें. मीही एकदम ओरडून म्हटलें,

" या गोंगाटानें माझी, फार झालें तर, झोंप मोडेल एवढेंच. पण निष्कारण ओरडून झोंप मोडणें असभ्यपणाचेंच नाहीं कां? डेनमार्कच्या पराक्रमी राजाला हें शोभत नाहीं."

" आम्ही तुला ठार मारूं!" अनेकजण ओरडले.

" किती मूर्ख आहात हो तुम्ही? यावरून तुमचा कट नाहीं कां उघड होत? आणि तुम्ही डेनमार्कचे माजी महाराज, हल्लींचे पिशाच्याधिपाति, तुमच्याजवळ जर एवढें सैन्य आहे, तर तुम्हींच आपल्या भावाला कां नाहीं मारीत? मला कशाला सांगतां ?"

" तो नीच कोठें आहे, हें तरी मला सांग! "

" मिळून तो नरकांत नाहीं तर ? अर्थात तो सत्पुरुषच असला पाहिजे, व आपणच महा पापी असलां पाहिजे. खरोखरच शेक्सपियर बेअक्कल खरा! पुण्यवंताला नरकांत लोटलें; व पाप्याला नुसतें मारवलें. बरें, हॅम्लेट हल्लीं कोठें आहे? "

" कमाल केली बुवा निफाडकर," एक स्नेही पुढें येऊन म्हणाला. " आह्मांला वाटलें, तुह्मीं घाबराल. आमच्या मनांतून तुमच्यांकडून एक वचन घ्यावयाचें होतें. "

" कोणतें? "

"हॅम्लेटवरील माझी टीका साफ चुकली असें तुमच्याकडून लिहून घेणार होतों. "

" अशा रितीनें? त्या पुराव्याला काय किंमत मिळती? "

" पुष्कळ! एक, भुतें आहेत हें आपण कबूल केलें असतें. दोन, भुतें

आपल्या सूक्ष्म आकारानें कार्य करतात हें आपणांस मान्य झालें असतें. तीन, भुतें शतकोनुशतकें नरकांत राहतात. हा नवीनच मुद्दा आपणांस सुचला असता. पण मुख्य फायदा असा झाला असता कीं, हॅम्लेटसारखी आपली कांहींशी स्थिति झाली असती; व शेक्सपियरच्या त्या नाटकाचे आह्मी गोडवे गातों, तसें तुह्मींही गाईले असते. ''

" पण आतां मलाच फायदा झाला किनइ? माझे सगळे मुद्दे टाम तर झालेच पण हॅम्लेटच्या बापाचें पात्र शेक्सपियरनें कसें चुकीचें चितारलें तें जास्त कळलें व हॅम्लेट माझ्यासारखा धीट व विनोदी असूनही कसा निष्क्रिय राहिला ही शंका येते. कां? आतां पटली किनई माझी हॅम्लेटवरची टीका?''

" पटली बुवा! '' पार्शी मित्र ह्मणाला.

" म्हणंज ! माझा होरॅशिओदेखील शत्रूंना मिळाला होता काय ? ''

" अरे हो! आम्हीं पूर्वीपासूनच हा कट उभारला होता. ट्यूब देखील मुद्दाम बर्स्ट केली. ''

" भले पठ्ठे ! पण शेवटीं तुमचा कटच बर्स्ट झाला म्हणायचा ? ''

" झाला खरा! '' आतां तुला बक्षिस देतों.''

पार्श्यानें चहाचें साहित्य काढलें; आम्हीं सर्वांनीं दोन दोन पेले चहा बिस्किटांसह घेतला. " पण कायहो ! '' मी विचारिलें " हा जाळ तुम्हीं कसा केला, व घोडा डोंगरावरून कसा उड्या मारित होता ? '' " अरे! इकडले पायरस्तेच मुळीं असे आहेत; '' "व जाळ ?'' अगोदर राळेचा. नंतर सनकाड्यांचा व नंतर गंधकांचा. घोडा व स्वार एकदम शिळांच्या आड झाले. घोडा शिकवलेला म्हणून खिंकाळला '' " शाबास ! '' शेवटीं मी त्याचे आभार मानतांना म्हटलें,

" भुतांबरोबर चहा पिण्याचा मला मोठा आनंद वाटत आहे ''



# वडे पापड !

[ या गोष्टीला अर्नोल्ड बेनेटच्या Old wives' Tale चा थोडासा आधार आहे. ]

" ऐकलंत कां सुंदराबाई? अन्नपूर्णाबाईंचा बाबू परीक्षेंत पास झाला हो! " यमुनाबाई देवपुजेच्या फुलवाती वळित असतांना ह्मणाल्या.

" अहो, नुसता पासच झाला नाहीं; तर त्याचा नंबर पहिला आला पहिला! आणि तोंही नाशिक जिल्ह्यांतच नव्हे, तर मुंबई इलाख्यांत! " सुंदराबाई देवप्रदक्षिणा संपल्यामुळें आपला शाल नीट सांवरून बसतां बसत उत्तरल्या. थोड्या वेळानें त्या किंचित् नाक मुरडून म्हणाल्या, "काय करावं, अन्नपूर्णाबाई जुन्या मतांच्या पडल्या; नाहीं तर त्यांच्या बाबूला मी माझी बाबी दिली असती."

" जसा कांहीं बाबू हटूनच बसला आहे यांच्या बाबीकरतां ! " असें नलिनीबाई आपल्या मैत्रिणीच्या कानांत बोलल्या. पण अशा खोंचदार भाषणांची थोडी तरी झळ सुंदराबाईनां लागावी ह्मणून त्या सुंदराबाईनांच ह्मणाल्या; " अहो! बाबू हुशार खरा; पण कमी का उनाड आहे ?"

" उनाडकीचं राहो मेलं ! " नलिनीबाईची मैत्रिण शारदाबाई म्हणाल्या; "पण सगळ्या चांदवडांत कीर्तन्यांची काय कीर्ति आहे ! बाबूचा बाप एकलकोंडा होता ; चुलता गर्विष्ट होता ; आणि आत्येनें कोणते दिवे पाजळले—अगबाई आल्याच कीं त्या ! "

अन्नपूर्णाबाई बाबूला घेऊन देवळांत आल्या. त्यांनीं बाबूकडून पुजाऱ्याकरवीं दुपारींच एकादसनी करविली होती; ब्राह्मण घातले होते ; व आतां पेढे वाटण्याकरतां त्या मुलाला घेऊन आल्या होत्या; तें शेरणीदान झाल्यानंतर बाबू आईला ह्मणाला,

" मी जाऊं आतां ? "

" बाबू, बस कीं रे थोडा वेळ! " सुंदराबाई मामलेदारीण काकू म्हणाल्या"

" तुला, ह्मणतात स्कॉलरशिप मिळाली; खरं कां? "

" हो मिळाली खरी; पण मला तिची जरूर नाहीं. "

" का? पुढं शिकायचं नाहीं काय? "

" पुढं शिकायला इयत्ता आहे कुठें ! " अन्नपूर्णाबाई ह्मणाल्या, आईच्या अज्ञानाचें बाबूला वाईट वाटतच होतें; पण लोकांत व आपल्यासमोर तिनें तें दाखवूं नये असें बाबूला वाटणें स्वाभाविक होतें; पण आईच्या मायेपुढें तिचें हें किरकोळ अवगुण उपेक्षणीयच वाटत. त्याला वाटत; पण नलिनी-बाईला कां म्हणून वाटावें ? त्यांनीं अन्नपूर्णाबाईला एक टोला मारलाच कीं, " चांदवडच्या संपल्या ; पण नाशकाच्या संपल्या नाहींत. "

" खरं का रे बाबू ? "

" नलिनी आत्या ...

" बाबू तुला आपल्या आत्येची भारी आठवण होते ? " नलिनीबाई बाबूला शद्वानें डसल्या. त्या बकिलीणबाई होत्या.

" आपण किती इयत्ता पुऱ्या केल्या आहेत ? " बाबूनें त्यांना कींवेच्या मुद्रेनें विचारिलें. " आपणाला माझ्या स्कॉलरशिपचा दाता कोण आहे, माहित आहे कां ? "

" कोण? " शारदाबाईनीं विचारलें. नलिनीबाईचा चेहरा केव्हांच उतरला होता.

" माझी आत्याच! जिच्या नांवाचा तुह्मीं आजवर व्यर्थ डांगोरा पिटविला तीच साध्वी ! "

" फार मोठी साध्वी !" नलिनीबाईचें नाक पुन्हां चढलें

" हो हो! फार मोठी साध्वीच ती! तिनें ब्रह्मचर्य पाळून आपल्या चित्र-कलेनं विलायतेंत नुसतं नांवच कमावलं नाहीं; तर हजारों पौंड मिळवून हिंदु चितार्‍यांकरितां स्कॉलरशिप्स देण्याची व्यवस्था करून, आज ती अमे-रिकेंत वेदांतावर व्याख्यानें देत आहे. तुह्मीं मात्र तिच्या नांवानं असेच दारो-

दारीं खडे फोडित चला. तुह्मीं बाया इतक्या वेडगळ व मूर्ख आहां.--

" दुसऱ्यानां शिव्या देण्याचं कीर्तन्यांचं व्रतच दिसतं! " नलिनीबाईनीं त्याला मध्येंच हटकलें.

" मूर्खांनां मूर्ख ह्मणून तें झाल्यास शहाणेच होतात; मूर्ख राहत नाहींत. मी मॅट्रिकची परिक्षा पास झालों इतकंच तुह्मीं समजतां. पण मला लंडनची " सरस्वती लॅन्ड्स्केप पेटिंग स्कॉलराशिप " मिळाली आहे हें तुह्मांला माहित आहे कां? पण मला त्या स्कॉलरशिपचीही जरूर नाहीं. मला स्वतंत्ररीत्या लंडनमध्यें राहून शिकतां येईल. खरं ना आई! "

" खरं आहे. पण बाबू! तूं जाणार नाहींस ना? "

" नाहीं. "

" माझा बाळ किती शहाणा आहे. त्याला माहित आहे कीं, आपल्या आईला आपण एकटेच आहोंत. "

" पण, आई, मीं इथंही राहणार नाहीं ? "

" नाशकास राहूं. आपणाला काय ? तिथंही आपलीं घरं आहेत. "

" आई, मीं इटालींत जाणार! "

" कशाला तें ? "

" तेथून पांचपंचवीस हुशार मुली येथें आणून या मूर्ख बायांत सोडून देण्यासाठीं ? "

" बाबू ! बाबू !! तूं मड्डुम कां घरांत आणणार ? "

" आई ! आई !! कुठें सरस्वती आत्या अन् कुठं तूं ! "

" अरे, वन्स हुशार असल्या तरी त्यांनां आमची सर कां येईल ? त्यांनीं मोठीं सुंदर चित्र काढलीं तरी आमच्या भिंतीवरल्या वडसावित्रीची बरोबरी त्यांनां साधेल कां ? "

" आई ! मग माझीं चित्रं कशी ग तुला आवडतात ? "

" अरे बाबा ! तूं पुरुष आहेस ? "

" अस्सं ! आई! तुह्मीं स्त्रियांनींच स्त्रियांची किंमत कमी करणें चालविलें

आहे खरें ! आई, तुलासुद्धां भावजयी आहेत ; व त्याही तुझी अशीच निंदा करतात. ”

“ करोत मेल्या ! त्यांच्या जिभेला हाड कां आहे ? ”

“ अन् तुझ्या जिभेला आहे वाटतं ? आत्याबाईंच्या खेटरांची—पण जाऊं द्या. तूं माझी आई आहेस. ” त्याला हंस आलें; तो पुढें म्हणाला; ”
“ मी तुझा मुलगाहीं पण आहे ; असंच किनई ? ”

“ मग नाहीं कीं काय ? ”

“ पण आतां घरीं चलतेस ना ? ”

“ मी आईला सोडून कुठंदेखील जाणार नाहीं, अशी महादेवाजवळ शपथ घे अगोदर. ”

“ आई ! बाबांनीं मॅट्रिकपर्यंत शिकण्याचा त्रास देऊन माझीं सात वर्षं फुकट घालवलीत. ती मी इटलींत घालविलीं असतीं तर माझी चित्रकलेंत किती तरी प्रगति झाली असती. आतां तूं तर कमालच करतेस !”

“ तें कांहीं मला माहित नाहीं. ”

“ आई! आम्हीं जन्मत: कीर्तन आहोंत हें तूं विसरतेस. ”

अन्नपूर्णाबाईंचें डोळे बाबूच्या मुद्रेला खिळले. आपल्या करारी पतीची दिराची व वन्सेचीच ही मुद्रा आहे हें तिनें पक्कें ओळखलें ; आणि तिनें हार खाल्ली. पण तिचेंही बावळेपणाचें पाणी जाईना. ती ह्मणाली “ बरं आहे बाबा ! चल ! इटलींत चल कीं अमेरिकेंत चल ! मी माझं वडेपापडाचं गाठोडं घेऊन तुझ्याबरोबर येईन ! ! ”

“ आई ! मीहीं महादेवाची शपथ घेऊन सांगतों कीं, तुझ्या वडेपापडांची माया मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं ! ”



# तें दृश्य कोणतें ?



" दादा ! त्या झऱ्याचें पाणी पिवूं नका !"

" कां ? "

" तो विटाळाचा आहे. "

झरा अस्पृश्यांचा आहे; व ही मुलगीही अस्पृश्यांची आहे; हे 'विटाळ' शब्द ऐकतांच रंगनाथांच्या लक्षांत आलें. त्याला मनस्वी तहान लागली होती. तो सायकलवर बसून, उन्हाळ्याच्या तिरप्या उन्हाचा, १७–१८ मैल एका दमांत आला होता. सूर्यबिंब अर्धे मावळलें होतें. रंगनाथाला परत फिरावयाचें होतें. पण पाणी पिऊन, पांच मिनिटांच्या विश्रांतीनंतर तो परत फिरणार होता. खानदेशांत मार्चमध्यें नद्यांना तर पाणी नसतेंच; तर ओहोळाला कुठून राहणार! पण एका पुलावरून तो सायकल दामटीत असतां, त्याला ती मुलगी त्या झऱ्यावर पाणी भरतानां दिसली होती; आणि तो पाण्याच्या आशेनें, तो झरा पुलापासून लांब असतांही, आपली सायकल घेऊन तेथें आला होता; पण तेथें हा प्रकार झाला. अर्थांतच त्याला दुसरा झरा उकरतां आला असता. पण आतां त्याचें लक्ष त्या मुलीकडे वेधलें होतें. तिच्याकडे पाहून व तिची दोनच वाक्यें ऐकून त्याला कसेंसेंच वाटूं लागलें. ती झऱ्यापासून दहा पावलें चढणीवर उभी होती. तिच्या डोकीवर दोन घागरी, कडीवर एक मडकें, व हातांत एक कळशी पाण्यानें भरली होती. तिच्या वळत्या तोंडावर व घागरींवर मावळतीं किरणें पडलीं होतीं. ती मुलगी विशेष नाजूक नव्हती; पण सुंदर असून तारुण्याची सजीवता तिच्या सर्वांगांतून--विशेषतः चेहऱ्यामधून, चमकत होती; असें रंगनाथाला वाटलें. तिच्या एकंदर ढबीवरून, पण विशेषतः पितळी व तांब्याच्या भांड्यांवरून, ती अस्पृश्य जातीची खचित नव्हे; ती मराठ्याची, कदाचित् खेड्यांतील ब्राम्हणाचीही असेल;

व ती निव्वळ थट्टा करीत असेल, असेंच रंगनाथाला वाटलें. ; व तसें त्यानें तिला बोलूनही दाखविलें.

" दादा ! मी थट्टा कशाला करूं ? मी खरोखरच मांग आहे. " तिनें उत्तर दिलें.

" मांग ! " रंगनाथ उद्गारला ! थोड्या वेळानें त्यानें विचारिलें " बाई ! माफी करा ! पण आपलें नांव सांगाल काय ? "

" दादा ! तूं भला आहेस हें मला माहित आहे. पण असें नांव विचारणें वाईट बरें कां ! " ती रागानें म्हणाली. पण तो राग खोटा होता. कारण तिनें लगेंच हंसून नांव सांगितलें कीं, " राधा. "

आतां मात्र रंगनाथाची खात्रीच झाली कीं, तिची ती केवळ थट्टाच होती. पण अशा स्थितींत मनाला व्यर्थ शिणवणारा तो नव्हता. तो म्हणाला ; "ठीक आहे ! मी हा झरा उपसून पाणी पीईन. " त्यानें तसें करण्यास आरंभ केलासुद्धां.

" एकंदरींत तुम्हांला अजूनसुद्धां विटाळचण्डाळ आहेच तर ! " राधेनें उद्गारात्मक प्रश्न विचारला. त्या उद्गारांत कांहीं वेगळेच ध्वनी उमटले व ते रंगनाथाला समजले. पण त्यानें कांहींच न समजल्यासारखें करून झरा उपसण्याचा सपाटा चालविला. त्याचें तें काम संपेपर्यंत तीही बोलली नाहीं. पण नवें पाणी निथळूं देण्याकरितां तो थांबला, तशी तिनेंही हातांतली कळशी खालीं ठेऊन म्हटलें कीं, " या कळशीनें अलीकडे पुष्कळ ब्राम्हणांनां पाणी पाजलें आहे. "

" कळशी पाणी पाजायलाच निघाली आहे, तर तिनें मी चुकूनही पाणी पिणार नाहीं. "

" मी बोलायला चुकलें असेन. आपणांला हवी असेल तर घ्या कीं, ही कळशी ! "

" अहो ! आळश्यांना कळशी ; मला देवानें दोन हात दिले आहेत कीं."

" हृदय दिलेलें दिसत नाहीं. "

रंगनाथ आश्चर्यानें थक्क झाला. Impossible ! " हा उद्गार त्याच्या तोंडातून सहजगत्या पडला.

" कां हो ! काय झालें ? Impossible असें तुम्हांला वाटलें तरी काय? " राधेनें तोऱ्यानें विचारिलें,

" कांहीं नाहीं. आतां आलें सारें लक्षांत. " रंगनाथाचें सारें आश्चर्य मावळलें. थोड्या वेळानें त्यानें तिला विचारलें. " माझें एक काम कराल ? "

" करतां येण्यासारखें असलें तर जरूर करीन. पण अगोदर हें पाणी प्या कसें. "

" आपण अगोदर आपलें ओझें खालीं ठेवा कशा. " असें ह्मणून त्यानें तिच्या घागरी व मडकें, खालीं उतरून घेतलें नंतर तो त्या कळशीतलें पाणी प्याला.

" कां ! कळशीनें पाणी पाजलेंच किनई ! "

" हें पाणी तर कोणीही घेईल. तें असो ; आपण शहर सोडून अस्पृश्यो-द्धारार्थ खानदेशांतल्या या एकीकडच्या खेड्यांत आलांत ; खरोखर चांगलें झालें. नाशकाच्या सत्याग्रहांत सांपडलां नाहींत, हें ही मला आवडलें. खरो-खरच आपल्या या गरीब पण सुशील अशा अस्पृश्यबंधूंनां, राजकारणाच्या वादळांत फेंकून देऊन त्यांची मजा पाहण्यापेक्षां, आपणांसारख्या सुशिक्षित ब्राह्मणस्त्रियांनीं —

" अरेच्या! हा काय जुलूम !! अहो मी खरोच मांग जातीची कन्या आहे."

" अशक्य ! केवळ अशक्य ! इतकी विचारसरणीही कदाचित् अस्पृश्यांनां एका पिढींत साधेल. पण इतका स्पष्ट शद्बोच्चार आनुवंशिक संस्काराशिवाय प्राप्त होणें सर्वथैव अशक्य आहे.—अरेरे ! एकाएकीं काय हो, झालें आपणांला ? राधाबाई ! मी कांहीं चूक केली कां ? आपणांला काय झालें ? आपण एकदम कां थिजल्या ? "

" आपण माझें एक काम कराल काय ? " तिनें खाकरून विचारिलें.

" करतां येण्यासारखें नसलें तरी करीन ! "

" मला चांगला टोला मारला ! "

" यांत टोला कसला ? ब्राह्मण अविचार क्वचितच करतात ; दुसऱ्यांकडून तर तें मुळींच करवीत नाहींत. "

"My God ! " राधाबाईनीं रंगनाथाकडे आश्चर्यानें डोळे फाडून पाहिलें. नंतर कांहीं वेळानें त्या उद्गारल्या. " माझे लवकरच डोळे उघडले म्हणायचें ! ब्राह्मणांविषयीं ब्राह्मणांनींच भावनांच्या भरांत द्वेष बाळगण्याला उठावें हें वाईटच. पण काय हो ! आपलें नांव विचारूं कां ? "

" बाई, तूं भली आहेस हें मला माहित आहे. पण असें पुरुषांना मांग स्त्रियांनीं नांव विचारणें वाईट बरें कां ! " रंगनाथानें हंसून तिला चिडवलें, आणि नांव सांगितलें कीं," रंगनाथ "

" रंगनाथपंत ! ब्राह्मणांचा ब्राह्मणांनीं द्वेष करूं नये, हें ठीकच आहे. पण ब्राह्मणांकडून चुक्या होत नाहींत काय हो ? "

" शेंकडों ! ब्राह्मणांनीं चुक्या केल्या नसत्या ..." तो एकाएकीं थांबला.

" तर काय झालें असतें ? "

" तर पाश्चात्यांच्या मूर्खपणाचीं कटु फळें आज जगाला खावीं लागलीं नसतीं. " रंगनाथाच्या खेदपूर्ण भाषणांतही आवेश दणदणला ! " राधाबाई! हें जग ज्यावेळीं ब्राम्हणमय होऊन जाईल —

" तेव्हां याच्या एका क्षणांत ठिकऱ्या उडतील ! " एका तेविशीच्या तरुणानें उड्या मारित येऊन रंगनाथाचें वाक्य पुरें केलें.

" हें काय रे अण्णा ! आम्हीं घाबरलों ना किती तरी ! "

" आम्हीं ! ताई हें आम्हीं कोण ?

' मी आणि —" राधाबाई लाजल्या. तिच्या भावाला त्या प्रकारानें कमा-

लीचें वाईट वाटलें. तो रंगनाथाकडे रागानें पाहूं लागला. चांदणेंही पिठोरीच पडणार होतें ; म्हणून त्याचा रागाचा तांबडा रंग, व त्याच्या ताईचा अनुरागाचा गुलाबी रंग, रंगनाथाला दोन्हीं दिसलें.

" ताई ! शेवटीं तुला अर्जुन भेटलाच ना ? "

" अण्णा, तूं आतां बळिराम होणार कीं, कृष्ण ? "

" हें बघ ताई ! आपण ज्या कामाला आलों—"

" अण्णा , तेंसुद्धां चुकलें. "

" चुकलें ! कसें ? "

" आत्मपरीक्षा कर हो ! उगींच ढोंग करूं नकोस ! "

" झालें ! तुझा अण्णाच ढोंगी झाला, तर त्याचें कार्यही—

" अर्थातच निव्वळ ढोंगाचें. तूं मिस्, सक्वारकरतांच, इथें नाहीं कां आलास ? तिच्याकरतांच तुला अस्पृश्योद्धार हवा ना ? "

" घटकाभर कबूल. पण त्यामुळें त्या कार्याचें पावित्र्य कोठें नष्ट होतें ? "

" इथें. तुझें कार्य प्रतिलोमविवाहावर अवलंबून आहे. "

" मग काय ? तूं तिच्या भावाशीं लग्न करणार नाहींस ? "

" त्या भावी पापापासून मला यांनीं वांचवलें. " राधेनें रंगनाथाकडे आपली कोमल तर्जनी---ती आतां रंगनाथाला फारच सुंदर दिसूं लागली-- करून लाजून म्हटलें. व पुढें त्याला उद्देशून ती म्हणाली " आपण आतां अण्णालाही परावृत्त करावें. माझें हेंच काम मी आपणांस सांगणार होतें. "

" ताई ! या जन्मींतरीं मी सक्वारला सोडणार नाहीं. "

" आणि तिनेंच आपणाला सोडलें तर ? " रंगनाथानें विचारिलें .

" मी प्राण देईन ! " अण्णा उद्गारला.

" मूर्खपणापायीं ? "

" मूर्ख म्हणा कीं, शहाणा म्हणा. माझें तिच्यावर प्रेम आहे खरें ! "

" तिचें नसलें तरी ? "

" तिचें आहेच ! "

" काय आहे ? "

" प्रेम "

" कुणांवर ? "

" सैतान ! " अण्णा रंगनाथाकडें सैतानाप्रमाणें पाहूं लागला !

" सैतान हिंदुधर्मांत नाहीं. " रंगनाथानें शांतपणें उत्तर दिलें.

" आपल्या रूपानें नुकताच आला आहे ! "

" पण हिंदुधर्म आपल्या पोटांत सैतानालाही सहज पचवील. त्याची तुह्मांला भीति नको. "

" हिंदु-धर्माचें अगदीं नांव काढूं नका ! ज्यानें सहा कोटी लोकांना ---

" आंकडे बरोबर आहेत ना ?"

" माझी आपणांशीं बोलण्याची इच्छाच नाहीं ! "

" मी अगदीं अस्पृश्यच ना ? "

" ब्राह्मण ज्या दिवशीं अस्पृश्य होतील त्या दिवशीं— "

" काय होईल ? "

" खरा सूड उगवला जाईल ? "

" सूड कशाबद्दल ? "

" प्राणहत्येहूनही घोर अशा मानसिक जुलुमांबद्दल. "

" ही निराधार भावना आहे. ब्राह्मणांनीं कोणांकोणांवर जुलूम केलेत ? मूठभर ब्राह्मणांनां सर्व जगावर जुलूम करतां तरी येईल काय ? आणि केलाच असेल तर त्यांच्या ठायीं तसाच अमोलिक पराक्रम असला पाहिजे. पण एवढें पाहिजे कशाला ? आपण कबूल करूं या कीं, आपली भावना अगदीं साधार आहे. मग आपणच सांगा कीं, अपराधांइतकीं तरी घनघोर शिक्षा पाहिजे ना ? मानसिक अधःपतनाच्या जुलुमांबद्दल आपण तर शारीरिक शिक्षा देतां ! ताई, यांचें नांव काय ? "

" काय रे तुझें नांव ? सांग बघूं त्यांनां ! साकनक कीं, भागनक ? "
" नका ! ताई ! त्यांनां असें चिडवूं नका ! अण्णासाहेब , आपण दोघेही पुरुष असून ब्राह्मण आहोंत. आपण आपल्या पूर्वजांच्या काल्पनिक पापांबद्दल, स्वत:लाच खरीखुरी मानसिक शिक्षा करून, पापविमोचनाला सुरुवात करूं या. तुमचें जर सक्वारवर खरें प्रेम असेल तर तुह्मीं तिच्याशीं मुळींच लग्न लावूं नका. मानसिक शिक्षेपेक्षांही हार्दिक शिक्षा मोठी ! मी देखील आमरण ब्रह्मचारी —
" छट् ! " राधा ओरडली ! " मला एकदम नाकबूल ! "
" बरोबर आहे ! " अण्णा ओरडला " बरें पकडलेंस. अहो महाराज ! तुम्हांला योग्य शिक्षा सांगतों. तुह्मांला अस्पृश्यांशीं विवाह करणें नापसंत आहे ना ? मग तुह्मीं सक्वारच्या बहिणीशींच लग्न करा. तुम्हांला खरी हार्दिक शिक्षा पाहिजेना ? "
" कोणीकडून तरी माझे Brother–in--law व्हा, असेंच किनई ! "
तिघेही मोठ्यानें हंसले !
" खांबोश ! तें पहा काय दिसतें तें ? कोणी माणसें दिसतात बुवा ! जरा या खबदाडांत बसून पाहूं या. ! "

\+ + +

त्या तिघांनां नंतर जें दृश्य दिसलें त्याचा परिणाम फार भयंकर झाला! अण्णाला ताबडतोब डॉक्टरकडे न्यावें लागलें ! आज तो मुंबईला आपल्या घरीं असून बराच सुधारला असला, व राधा-रंगनाथाचा विवाह त्यानें स्वत: लावून दिला असला तरी, त्याची स्वत:ची विवाहपत्रिका अजून आमच्या-कडे येत नाहीं ! पण आह्मांला अजून आशा आहे कीं, त्याला एखादा मार्मिक भेटेल, व त्याच्या विवाहाचे लाडू आह्मांला अजून खावयाला मिळतील ! ब्राह्मणो भोजनप्रियाः ! सुधारको ब्राम्हणोऽपि ॥



# स्त्रीच मारते व स्त्रीच तारते !



" काय ? काय म्हटलं तुम्हीं ? " सगुणेनें त्या म्हातारीला जरा आश्चर्यानें, बरेंच दचकून, आणि पुष्कळसें भिऊनच विचारिलें.

ती असें कांहीं उद्गारणारच हें त्या म्हातारीला माहित होतें. ती थेरडी चांगलीच निढावलेली होती. तिनें सगुणेकडे डोळे मिचकावून, थोडेसें बोळकें खुलें करून व खुषीच्या मुद्रेनें पाहिलें ; व ती मनांत समजली कीं, ' आहे ! मुलगी पण मुलगी आहे ! ' नंतर ती मोठ्यानें म्हणाली ; " पोरी ! अशी दचकलीस कशाला ? अग , घाबरण्याचें काय कारण ? प्रथम नवीन वाटेल खरं ; पण एकदां अंगीं जडलं कीं, सारी मजाच मजा ! खरं किनई रेणू ? "

रेणू लाजली. म्हातारी मुकदमीण आपणांला त्या बाबतींत विचारून लाजवील अशी त्या बिचारीला कल्पनाही नव्हती. तशी ती सगुणेपेक्षां एखाद्या पावसाळ्यानें लहानच होती. तिचे डोळे नाल्याच्या कोरड्या वाळू-कडे लागले. ती बोलत नाहीं असें पाहून म्हातारी तिला म्हणाली, " अग बोल ! तुला कांहीं आतां पारकें नाहीं. तूं कशाला लाजतेस ? तुला त्या भिकारड्या जीनांतून काढून मी या प्रेसांत लावल्यापासून तुझं कोट-कल्याण झालं किनई सांग ! आतां अंगांत कशी रेशमी तंग चोळी आली; बामणांच्या बायांवाणी इलकली लुगडं पण आलं ; पायांत जोडवीं चमका-यला लागलीं ; आणखीन् पुढच्या हंगामापर्यंत गळ्यांत पुतळ्याची माळ सुद्धां पडेल ; खरं ना ? सगुणे ! तुला नको कां दागदागीने ? पाहिजे असतील तर हो म्हण. अग ! आज मुकदमसाहेब तर उद्यां मोठ्या साहेबांची गांठ पडेल. ना ?

सगुणेकडून जास्त ऐकवेना. तिनें तोंडातला कांदाभाकरीचा घांस-

मुद्धां ओकून टाकला; व लगबगीनें झऱ्यावर जाऊन हात धुवून, व दोन घोट पाणी पिऊन, तडक आपल्या झोंपडीचा रस्ता धरला.

म्हातारीला नकाराचा हा पहिलाच अपमान सोसावा लागला. पण तिनें रेंगूसमोर तो मनांतच ठेवला. तिनें पलीकडल्या नंबरांत तटकाळून ठेवलेल्या मुकदमाला खूष करण्याचा रेंगूलाच हुकूम फर्माविला; व सगुणेची खोड कशी जिरवितां येईल, याचा विचार करीत प्रेसचा रस्ता सुधरला.

सगुणा अवेळीं घरीं आलेली पाहून गणूजीला आश्चर्य वाटलें. त्यानें तिला कारण विचारीलें,

" माझं आज डोकं दुखूं लागलं म्हणून लवकरच आलें. "

" डोकं दुखायला झालं काय ? " असा तिरसटपणाचा एक वाग्बाण मारून त्या पतिराजानें तिला विचारलें " पण सखु मुकदमीणीला सांगून आलीस ना ? नाहीं तर अर्धा दिवसही फुकट जायचा ! "

" हो ! "

पतिराज पांच मिनिटांत घोरूं लागले. सगुणेनें मिळविलेल्या अन्नाचा मद त्यांच्यावर चढण्याची त्यांची तीच वेळ होती. शिवाय रात्रींचीं जागरणेंही करण्याची त्यांना संवय असल्यानें ते दुपारचे, गुहेंतले वाघ होत असत.

सगुणेचा तो दिवस निभावला. पण दुसऱ्या दिवशीं जर सूर्य उगवणार नाहीं तर किती पण चांगलें होईल असें तिला रात्रभर वाटत होतें. पतिदेवाची व स्वतःचीही भाकरी भाजण्याकरितां ती रोज सकाळीं पहाटेस उठे, तव्हां शेजारणीचा कोंबडा आरवे, व सगुणेचा नवरा घरीं परत येई ! नित्याच्या संवयीप्रमाणें पतिविरहामुळें अश्रु गाळित निजण्याचें सौभाग्यही तिला आज रात्रीं मिळालें नाहीं. तरी नित्याच्या संवयीप्रमाणें ती पहाटेस उठून चुलीशीं बसली; व नित्याच्या रिवाजाप्रमाणें शेजारणीचा कोंबडा आरवला; नित्याच्या शिरस्त्याप्रमाणें गणूजीही पण घरीं परत आला; अरेरे ! नित्याच्या ब्राम्हणांच्या अर्घ्यदानांसाठीं सूर्यही, सगुणेचें दुःख न ओळखतां

क्षितिजावर आला ; नित्याच्याच आवाजानें प्रेसचा भोंगा वाजला ; पण सगुणेच्या हृदयांत मात्र नित्याची आशेची कॉमेडी न चालतां निराशेची ट्रॅजेडी चालली होती. तिनें भाकरी भाजल्या, तिचा पति जेवला, तिनें आपली शिदोरी बांधली ; पण दाराबाहेर तिचा पाय पडेना ! प्रेसचा दुसरा भोंगा झाला ; तरी सगुणा घरांतच ! काय करील बिचारी !

" कां ? आज पाय दुखतात वाटतं ? "

सगुणेच्या कंठातून जोराचा हुंदका पडला ! " रडायला काय झालं ? मी अजून जींवत आहे म्हणून ? " गणूजी ओरडला.

आतां मात्र त्या साध्वीकडून राहवेना ! तिनें आपलें रडें आवेशानें आवरून आपल्या पतीचे पाय धरले ; व म्हटलें ; " मी प्रेसांत जाणार नाहीं. प्रेसांत पापांची खाई भरलेली आहे ! "

" पापांची खाई " हे शब्द तिनें उच्चारतांच गणूजीचे डोळे चवताळलेल्या वाघासारखे लालबुंद झाले. तो ओरडून म्हणाला ; " अग हो हो ! मी काय वाटेल तें करीन ! तू कोण मला बोलणार ? रेणूला मी घरांत आणित नाहीं, हें भाग्य समज ! "

" रेणूला ! ! " सगुणेनें आश्चर्योद्गारानंतर आ पसरला !

" कां ? आश्चर्य कसलं वाटलं ! रेणूला उद्देशूनच तू पापांची खाई म्हटलंस ना ? पण ध्यानांत ठेव ; मी तिला घरांतसुद्धां घेईन. तुझ्या पैशाची तुला घमेंड असेल तर चालती हो. मला रेणू खायला घालील. "

सगुणेच्या मेंदूवर दुःखोद्वेगापेक्षां आश्चर्याचेच जास्त मोठे ठोके पडत होते. तिनें नवऱ्याला विचारलें ;

" रेणूला म्हटलं नवरा आहे ? "

" असेल. "

" नवऱ्याच्या बायकोनं असं करावं कां ? "

" हें तिचं तिनं पहावं ? "

" प्रेसांत सगळ्याच रेणू आहेत कीं काय ? "

" मला काय माहित ? "

" समजा असल्या ! "

" पुढें "

" मी तेथें रहावं कां ? "

" तुझ्याबद्दल माझी खात्री आहे. "

सगुणेला चार मुठी मास एकदम आलें! ती म्हणाली, " पण मुकदमीणबाईनें माझ्यावर प्रयोग केला तर ? "

आतां गणूजीच्या डोक्यांत उजेड पडत चालला! पण दुष्कर्माच्या दुर्दैवाची पकड ती, अशी तशी सुटत नाहीं!! त्याचवेळीं रेणू आली ; व सगुणेला म्हणाली,

" कां? आज प्रेसांत जायचं नाहीं वाटतं ? "

" पण तुला उशीर कां झाला ? " गणूजीनें विचारिलें. सगुणा तर तिच्याकडे पहावयासही राजी नव्हती.

" मला आज बंगल्यावर काम निघालं . " रेणूनें तोऱ्यानें सांगितलें

" बंगल्यावर ? कोणाच्या ? "

" जरा बाहेर या. सांगतें. "

ती दोघें पांच दहा मिनिटें बाहेर बोललीं. पुढें रेणू निघून गेली व गणूजी रागारागानें झोंपडींत आला. त्यानें आंत येतांच सगुणेच्या कमरेंत घालण्याकरतां लाथ उचलली; तसें तिनेंही धीटपणानें म्हटलें ;

" थांबा! रेणूसारख्या कुलटा, दुसऱ्यांच्या संसाराला कसा उलटा रंग फासतात हें अगोदर डोळ्यांनीं पहावं ; व मग माझा, हवा असल्यास गळा कापावा ! "

त्या साध्वीचें भाषणसुद्धां संपलें नसेल तोंच गणूजी धाडकन् खालीं पडला. त्याचें शीर धडापासून वेगळें होऊन वेगानें भिंतीवर आपटून सगुणेच्या पायाशीं पडलें ! व वळवळ करूं लागलें !! धडांतून रक्ताच्या धारा वरती उसळून त्या झोंपडीच्या छपरांतला कडबा भिजवीत होत्या ! !

सगुणेच्या हृदयांत एकदम इतक्या भावना उत्पन्न झाल्या कीं, तिची त्यामुळें मतिच कुंठित झाली. थोड्या वेळानें तिला कोणी खूप मोठ्यानें ओरडल्या सारखें ऐकूं लागलें " घे ! घे + + हा तुझा + + !! "

या ओरडण्यानें सगुणा भानावर येते न येते तोंच तिच्या पायावर कोणी तरी कोलमडून पडल्याचें भासलें. पहाते तों रेणूचें प्रेत ! तिच्या शरीरांतून रक्ताचे प्रवाहच वाहत होते ! सगुणेनें आपले डोळे मिटून घेतले. ! तिला मूर्च्छा आली ! !

ती छत्तीस तासांनीं दवाखान्यांत शुद्धीवर आली. नंतर तिची शरीरप्रकृति साधारण बरी झाल्यावर, तिच्या मनाची अगोदर तयारी करून सिस्टरनें तिला एक पत्र वाचावयाला दिलें ; तें असें होतें.---

साध्वी सगुणाबाई ,

आपल्या पतीच्या नाहीं तरी, माझ्या बायकोच्या रक्तानें मी हें पत्र लिहित असलों तरी, मी तुमच्या सारखाच पुण्यवान् आहे ; म्हणून मी तुम्हांला प्रथम साष्टांग नमस्कार करतों. तुमच्यासारख्या साध्वी स्त्रिया खरोखरच नमस्कार करण्याला लायख असतात. मी आज तुमच्या झोंपडींतले दोनच खून केलेले नसून माझ्या बायकोशीं संबंध असलेले बरेचसे मी ठार मारले आहेत ! मला सगळे ठार मारतां आले नाहींत याचें अत्यंत वाईट वाटतें. विशेषत : ती काळनागीण मुकदमीण जिवंत राहिली याचें मला शल्य बोचतें. माझ्या मनांत फांसावर मरायचें नसून स्वतःच्याच हातानें वीरासारखें मरायचें आहे; ह्मणून मला आतां जास्त खून करायला मुळींच वेळ नाहीं. आमच्या घरानांगरांनां ज्या कारखान्यांनीं कणून काढलें, त्यांनां आगी लागल्या तरी ते दुप्पट जोरानें वाढतात. आमच्या दारिद्र्यानें आम्हीं इतके हतबल झालोंत कीं, आम्हां साधारण साक्षर पुरुषानांही पोराबायकांचें पोट तर भरतां येत नाहींच ; पण आमच्या कुळंबिणी पतिव्रता, ज्या पूर्वी आपल्या स्वतःच्या शेतांत पतीबरोबर खुर्पानें पेरण्या करीत होत्या, त्या पतिव्रतांनां, त्याच आपल्या शेतांतल्या गिरण्यांतून ठायीं ठायीं अब्रु विकण्याची लाज वाटूं नये---सगुणाबाई काय सांगूं माझी कहाणी !

रेणू माझी दुसरी बायको ; व माझी अत्यंत आवडती बायको होती. या गिरणीवाल्यांनीं पहिलीची तर इतकी भयंकर स्थिति केली होती कीं, ती कोणत्याही माणसाला दिडकी किंमतीची होती ; व त्यांनां थोड्याशा आड-पडद्याचीही जरूरी नव्हती. अर्धवेड्या माणसाला मी तरी किती जपावें? पण देवानें तिच्यावर काळाचा पडदा टाकला. रेणूला मात्र मी तशी जरूर पडूंच दिली नव्हती ; पण नवऱ्याला चोरून श्रीमंती भोगण्याची तिला चटक लागली ; आणि त्याचा हा असा परिणाम झाला ! साध्वी ! तुझ्या पतीच्या खुनाबद्दल मला क्षमा कर ! आणि देवा ! या कारखान्याचा नायनाट कर रे ! नायनाट कर !!

आपला हीन दीन बंधु
भगवान्

कारखाने तर मोडले नाहींतच. पण सगुणेनेंही पुन्हां कारखान्यांचें तोंड पाहिलें नाहीं. तिनें पाट लाविला नाहीं; पण तिनें एकच ध्यास धरला आहे ; तो असा कीं, स्त्रियांनां शरीरपवित्र्याचाच मुख्यत : उपदेश करावयाचा. तिनें अनेकांशीं संभाषणें करून आपलें तद्विषयक ज्ञान वाढविलें; ती ओघाओघानें पुस्तकेंही वाचूं लागली ; व शेवटीं तर तिनें तद्विषयक दोनचार ग्रंथही लिहिले आहेत. परंतु ती ते ग्रंथ कांहीं केल्या छापवीत नाहीं. कारण तिला यंत्रशक्तीचा कमालीचा तिटकारा आला आहे. तिचे एक दोन ग्रंथ आम्हीं वाचून पाहिले व यंत्रद्वेषाचा भाग सोडून मुख्य स्त्रीदेहपवित्र्याचा मुद्दा घेतला तर त्यांत ती आम्हांला सात पतिव्रतांपेक्षांही जास्त पतेची वाटते. सगुणेनें अखिल स्त्रीजातीचा खोल विचार करून त्याच्या स्त्रीधर्माची अशी सुंदर विचिकित्सा केली आहे कीं, तसें जर प्रत्यक्ष घडलें—आणि घडणार हें खचित—तर मानव्याला स्त्रीच मारते व स्त्रीच तारते हें जगाला अनुभवाला येईल !



# जलचरांची सभा



रामेश्वराचा उन्हाळा; दिवसभर कशाला, रात्रीं ११ वाजेपर्यंत देखील सहन करून, शेवटीं निरुपाय ह्मणून, मैलावरच्या लक्ष्मणझरोक्याच्या ओरीचा मी आश्रय घेतला होता. तेथें मात्र शीतळ वारा वाहत होता. तेथें रात्रीं रहाण्याचें धोक्याचें होतें. पुजारीदेखील संध्याकाळींच रामेश्वरीं परत जाई. पण उकडून मरण्यापेक्षां वारा पीत पीत मरणें पुष्कळ बरें, असा निर्धारच करणें मला भाग होतें. मला पांचदहा मिनिटांतच गाढ झोंप लागली.
" उठा उठा महाशय ! उठा ! पळा ! नाहीं तर फुकट मराल !" असे शब्द माझ्या कानीं आले. त्याच्या अगोदर मला कोणी तरी जबरदस्तीनें उठविलें होतें. माझ्या डोळ्यांवर झोंपेचें पटल होतेंच. मी विचारिलें,
" कां ? "
" अहो ! सारे जलचर आपल्याविरुद्ध उठले आहेत ! "

नुकत्याच, जागा होत असलेल्या माणसाला, या वाक्याचा काय अर्थ बोध होणार ? बरें; जलचर ह्मणजे इंग्रज किंवा जपानी ह्मणावें, तर मला संकटाची इशारत देणारा इसम कोळी जातीचा दिसत होता. मी विचारिलें,
" अरे, चलचर इथें कसे येतील ? "
" खरें. पण त्यांचे स्नेही आपल्याला खातील. हे पहा माझे त्यांनीं कसे लचके तोडले आहेत ! "
" खरेंच कीं रे ! पण जलचरांचे स्नेही कोण ? "
" रानडुकरें ; बेडूक ; सर्प—

सर्प म्हणतांच त्या देवळाच्या वालुकामय टेकडीवर जिकडे तिकडे सापच साप चढतांना दिसले. मधून मधून रानडुकरें व बेडूकही होते. सर्पांबेडकांची मैत्री पाहून मला भारी आश्चर्य वाटलें. पण संकटाची तीव्र-

ताही पटली. पण तो कोळी तर दुसऱ्या वाटेनें केव्हांच पळून गेला. निमिषांत शत्रुसेना मजवर चालून आली. काय असेल तें असो. माझी विनोदवृत्ति संकटकालींच उदय पावते: मी त्या शत्रूनां ह्मटलें, " हें पहा! झोपीं गेलेल्या माणसाला मारण्यांत भ्याडपणाच नसतो काय ?"

" तुह्मीं माणसांनीं आमच्या शिकारी आमच्या जागेपणींच चालविल्या आहेत काय ? " एक रानडुकर ह्मणालें.

" आह्मांला बिळांतून काढूनही तुह्मीं माणसें चेंचित नाहींत का ? " एका सापानें मला विचारिलें.

" आम्हांला भूल देऊनच, तुह्मी शास्त्रीय शोधांसाटीं आमची निर्दयतेनें चिरफाड करतां ना ? " एका मोठ्या बेडकानें गाऱ्हाणें केलें ; " तरी आह्मी तुह्मांला चुकूनसुद्धां उपद्रव करित नसतों. "

आस्ते आस्ते मला कळूं लागलें कीं, आह्मां मानवांच्या, जन्मसिद्ध हक्कांच्या सभांचें वारें जंगलांत व जलांतही संचारूं लागलें आहे ; तथापि मी आतां खडखडित जागा झालों होतों ; आणि माझी स्थितीही मोठी विनोदाची होती. मी ह्मटलें,

" एकूण रानडुकर माझी शिकार करणार, सर्प मला दंश करणार, व बेडूक माझी चिरफाड करणार म्हणायचें !"

" असेंच कांहीं नाहीं. आह्मीं तुला व तुझ्या जातीला ठार मारणार. "

" मारा कीं. पण न्यायानें मारा. जशास तसें. रानडुकरानें मला बंदुकीनें मारावें ; सर्पानें माझें तोंड चेचावें, व बेडकानें माझी पोस्ट मॉर्टम करावी. शास्त्रीय शोध लावावा ही देखील अट घालणें न्यायाचें होईल. "

माझें ह्मणणें त्यांनां पटलेसें दिसलें. कारण ते परस्परांकडे पाहूं लागले. या संशयवृत्तीचा तावडतोब फायदा घेणें मला इष्ट वाटलें. त्यांच्यांतच भेद नीति उत्पन्न करावी असें मला एकदां वाटलें; पण ब्रिटिशांच्या व आमच्या आर्यचाणक्याच्या त्या नीतीचा फोलपणा मला पटला होता. म्हणून मी त्यांनां वेगळेंच विचारिलें,

" काहो ! कोळी सांगत होता कीं जलचरांनीं माणसांच्या विरुद्ध युद्ध पुकारलें आहे. खरें कां ? "

" खरें आहे. "

" मग तुह्मीं त्यांना सामिल कां झाला ? "

" त्यांचें ह्मणणें आम्हांला पटलें. आम्हीं त्यांनां थेटपर्यंत मदत करण्याचें वचन दिलें आहे. "

" खरेंच चांगल केलें. आतां आपल्या वचनाला पूर्णपणें जागा. मित्रद्रोहा-सारखें दुसरें पातक नाहीं. आपल्या मित्राचें कल्याण साधणें यासारखें पवित्र कार्य दुसरें कोणतें आहे ? पण कायहो ! माणसांच्या विरुद्ध जलचरांनीं युद्ध पुकारलें तेव्हां त्यांनीं माणसांशीं बोलणें तरी केलें होतें कां? आणि तुह्मी देखील जलचरांशीं मैत्री करण्यापूर्वी माणसांचें ह्मणणें ऐकलें होतें कां ? खरें ह्मणाल तर, जलचरांनीं आमच्याविरुद्ध कां लढावें हेंच मला समजत नाहीं. "

" तें कांहीं नाहीं. " रानडुकर संतापून म्हणालें. " युद्ध ह्मणजे युद्ध ! कां, कसें, केव्हां, कोणी, हें पहाणें विचारपीडितांचें काम आहे. आम्ही तुला ठार मारणार ! "

" मित्रा ! " सर्प रानडुकराला म्हणाला, " असा आतताईपणा पराक्रमी प्राण्याला तर मुळींच शोभत नाहीं. कारणाशिवाय हत्या आह्मी सर्प तरी करणार नाहीं. हीं माणसें आम्हांला, दिसेल तेथें मारित असलीं, तरी आह्मी आम्हांला डंवचल्याविना यांनां चुकून दंश करित नाहीं. आमचें लहान पिल्लूंदेखील हे सहज मारितात, पण यांच्या लहान पोरांनीं आह्मांला पिरगा-ळलें तरी आह्मीं त्यांनां डसत नसतों. तेव्हां मला वाटतें कीं, याचें ह्मणणें ऐकून घेऊं या. "

" मलाही तसेंच वाटतें. " बेडूक ह्मणालें. " या माणसांशीं आमचें प्रत्यक्ष वैर नाहीं. तसेंच पाहिलें तर यांच्यांतही कांहीं उत्कृष्ट गुण आहेत. यांनीं आम्हां बेडकांनां संस्कृतपंडितांचा दाखला दिला आहे ; सर्पांची तर हे पूजाच करितात ; व वराहांनां तर यांनीं एका अवताराची महती दिली आहे. तेव्हां यांचें म्हणणें अगोदर ऐकलेंच पाहिजे. "

" आमची कांहीं हरकत नाहीं. " रानडुकरानें रुकार दिला.

" मित्रानो, मी तुमचे अंतःकरणापासून आभार मानतों. " मी मग शांतपणें म्हटलें ; " पण आपण असें करूं या कीं, जलचरांशींच बोलूं या. त्यांचें ह्मणणेंही आम्हांला कळेल. "

" पण ते तुला ताबडतोब ठार मारतील. किनाऱ्यांवर सुसरी आ वासून बसल्या आहेत ; खेकड्यांचे आंकडे तुला फाडायला तयार आहेत ; व जलाश्व तुला तडातड लाथा मारण्यास टपले आहेत. तूं आह्मांलाच सांग तुझें ह्मणणें म्हणजे तें आह्मीं त्यांना सांगू. "

" मित्रानो ! लढायचीच गोष्ट काढाल तर आह्मां माणसांपुढें कोणाचाही टिकाव लागणार नाहीं. पण युद्ध अझून ठरावयाचें आहे आम्हीं मानव युद्धनीतीला सहसा सोडित नाहीं ; व जेव्हां सोडतों, तेव्ह आमचा नाशच होतो. तें असो म्हणा, मला जलचर फाडूंच लागले तर तुम्ही माझें रक्षण करालच. "

' हो करूं; " रानडुकर अवसानानें म्हणालें " तूं माणसांचा वकील या नात्यानें चलतांस; तेव्हां तुझें रक्षण झालेंच पाहिजे, "

" पण वकिलीपेक्षां जास्त कांहीं वात्रटपणा केलास तर मात्र आम्हं जबाबदार नाहीं अं ! " सर्प म्हणाला.

" अहो माणसाला मोठें प्रसंगावधान असतें. त्यांतून हा तर बराच गोडबोल्या दिसतो. " बेडूकपंडित गंभीरतेनें बोललें.

नंतर आम्हीं सगळे रामेश्वरापुढें समद्रकांठीं गेलों. आमच्यापुढें आमचे कांहीं जासूद जलचरांकडे गेले होतेच. त्यामुळें दंगाधोपा न होतां, सबंध समुद्र व किनारा जलचरांनीं गच्च भरला होता. आह्मी जातांच आमचें यथोचित् स्वागत झालें ; व नंतर एक देवमासा आपल्या बारक्या भोंकाच्या आवाजानें बोलूं लागला,

" अरे मानवीप्राण्या ! मी आज मुद्दाम मादागास्करहून येथें आलों आहे. सागर महासागर आखात नद नद्या नाले ओहोळ व जलाशयें, यांतील एकूण

एक मत्स्य रोजच्या रोज क्रोडोंच्या थव्यांनीं येथें येत आहे. आह्मी परस्परांतील वैमनस्यें विसरून माणसांशीं रणसंग्राम खरून त्यांचा संहार खचित करणार ! कारण आज युगानुयुगांपासून तुम्ही आमचीं नाना प्रकारचीं पक्कान्नें करून खात आहांत. " ताजा रेड् हेरिंग " " सर्वोत्कृष्ट कॉड्लिव्हर ऑईल " वगैरे तुमच्या जाहीराती पाहून, आमची आग वडवानलाहून जास्त भडकली आहे ! ईश्वरानें तुह्मांला भूमि दिली. पण तुह्मी आमच्या साम्राज्यांत घुसून, आपल्या अजस्र जहाजांनीं आमचीं शरीरें कांपतां ! आमचीं पोवळीं, आमचीं मोत्यीं, व आमचीं माणकें लुटतां. परवां एका बदमाषानें तर हिंदी महासागरांतल्या आमच्या राजकन्यशीं सलगी केली. आह्मी त्याला ठार केला; पण यापुढें आह्मी मनुष्य जात जगावर राहूं देण्यास तयार नाहीं. आमचे दोस्त रानडुकरें, बेडूक, सर्प, दलदलींतले हत्ती, पोटांत पाण्याची पिशवी वाहणारे उंट वगैरे सर्वजण या युद्धांत सामिल झाले आहेत. आतां तरी आमचें ह्मणणें कळलें ना ? पटलें कीं नाहीं ; हें आह्मी पहात नाहीं. या दोस्तांकरितां ही सभा भरवून तुला आमचें ह्मणणें फक्त कळविलें आहे ; समजलास ! "

त्याचें भाषण संपल्यावर मी शांतपणें हंसून ह्मटलें, "देवमत्स्याधिपते ! तूं तर आमच्या परमेश्वराचा पहिला अवतार आहेस ! तुझी आज्ञा आम्हां मानवांनां वंद्यच असणार ! तुह्मी सांगतां, मी जास्तत बोलूं नये. ठीक आहे. मी मुळींच बोलत नाहीं. पण आम्ही मानवांनीं तुमचा संहार केला नाहीं तर तुम्ही सुखी व्हाल ना ? "

" अर्थात. "

" ठीक आहे. आजपासून एकही माणूस मत्स्यभक्षण करणार नाहीं. व आमची लहानशी होडीसुद्धां, जलावर तरंगणार नाहीं. फार काय ? पण पावसाळ्यांत आमच्या पोरांच्या कागदी होड्याही तुम्हांला दिसणार नाहींत ; मात्र एका महिन्यानंतर तुम्ही पुन्हां सभा भरवून तुमचीं सुखदु:खें मला सांगितलीं पाहिजेत. "

" कबूल ! " देवमासा ओरडून म्हणाला. " आजपासून एक महिना युद्ध तहकूब ! सभा बरखास्त !! "

एक महिना संपला. दुसरी सभा झाली. तेव्हां पहिल्या सभेपेक्षां दुप्पट मत्स्य व तिप्पट पशु हजर होते. देवमाशानें सलगीच्या भाषेंत बोलण्यास आरंभ केला; " देवमाणसा ! गेल्या महिन्यांत माणसांकडून आम्हांस मुळींच त्रास झाला नाहीं, हें खरें आहे. पण आम्हांला पक्ष्यांनीं सळो कां पळो करून सोडलें आहे. ब्राझिल देशांतले पर्वतप्राय पक्षी तर आमचा अहोरात्र फन्ना उडवित आहेत ; त्यामुळें आह्मांला मोठीच काळजी उत्पन्न झाली आहे. तुमच्याशीं लढण्याकरतां आम्हांला पशूंची मदत झाली असती. पण पक्ष्यांशीं लढण्यांत पशूंनां जय मिळत नाहीं, हें मागल्यां एका अनुभवावरून स्पष्ट झालें आहे. तेव्हां तुह्मी आपल्या विमानांनीं व शस्त्रास्त्रांनीं पक्ष्यांशीं लढा ; व आमचा संहार बंद करवा, अशी आमची तुह्मांला प्रार्थना आहे," मी त्याला उत्तर दिलें " आह्मी मानव आपण होऊन कोणाच्याच भानगडींत पडत नाहींत. पण पडलोंच तर, आमच्या आड कोणीं आलेलें आह्मांला खपत नाहीं. आह्मी आमच्या बुद्धीचा अभिमान बाळगतों असें नव्हें ; पण खरोखरच इतर प्राण्यांनां अक्कल कमी असते. तुमची पशूंची अथवा पक्ष्यांची गोष्ट कशाला, प्रत्यक्ष देवांनींसुद्धां आमची मदत घेतांना आमचें तंत्र संभाळलें आहे. तथापि मी तुम्हांला त्रास न देतां सांगतों कीं, आजपासून पक्षीसुद्धां तुमच्या वाटेला जाणार नाहींत. पण फिरून एक महिन्यानंतर तुम्ही तिसरी सभा भरवून, आपलीं सुखदुःखें सला निवेदन केलीं पाहिजेत. "

" कबूल !" देवमासा म्हणाला, व माझा त्यांनीं हिपिपुर्‍हा केला !

तिसरी सभा मात्र जेमतेम भरली. कारण जलचरांतच इतकी भयंकर रण माजून राहिलीं होती कीं, लहान मासे तर राहोतच, पण मोठमोठे मासेही सभेला आले नाहींत. तो देवमासा मात्र अत्यंत खिन्नपणें आपल्या कांहीं मित्रांसवें आला होता. पण या सभेला पशु पक्षी व माणसें यांच्या झुंडीच्या झुंजी हजर होत्या. देवमासा म्हणाला ;

" काय सांगू महाराज ! आरंभीं स्थिति होती तीच बरी होती. आमच्यावरचीं संकटें नाहींशीं होतांच आमच्यांतलीं वैमनस्यें इतकीं बोकाळलीं, कीं गेल्या एका महिन्यांत, आमचें शंभर वर्षांचें नुकसान आम्ही स्वदंतांनीं केलें. महाराज ! आम्हांला तारा ! ! मी आपल्या पाया पडतों ! "

" ऊठ मत्स्यराजा ! ऊठ ! ! " मी त्याला प्रेमानें थोपटून म्हटलें. " तूं असा शोक करूं नकोस ! ईश्वर करतो तें नेहमीं बऱ्याकरितां करतो. पहा कीं, तुमची तरी आम्हांला पुरी माहिती कोठें होती ? अजून तरी कोठें आहे? अरे ! आमच्या भूमींचे देखील सर्व भाग आम्हांला ज्ञात नाहींत, तर सागराची व आकाशाची गोष्ट कशाला ? आतां तुमच्या नगरांत आम्ही येऊं. आपले मिश्रविवाह होतील. त्यामुळें आमच्या नगरांतही येण्यासारखीं तुमचीं शरीरें होतील. पशुपक्ष्यांनींहि हे प्रयोग केले पाहिजेत. एकेक प्रयोग साधावयाचा म्हणजे अनेक प्राणी तेवढ्याकरतां बळि पडतात व मनाला आकळ्या उत्पन्न होतात. ही मिश्रविवाहाचीच गोष्ट घ्या ना ? तुमच्यांप्रमाणें पशूंनां व पक्ष्यांनांही कसेंसेंच वाटतें. माणसांची तर गोष्टच नको. त्यांनां वाटतें कीं आम्ही सर्व श्रेष्ठ ; आम्ही पशुपक्षीजलचर कसें व्हावें ? मी देखील मागल्या सभेंत म्हटलें होतें कीं, माणसें देवांपेक्षांही श्रेष्ठ असतात : व तीं बुद्धीमत्तेंत खरींच श्रेष्ठ आहेत. पण बुद्धि एवढें एकच साधन नसतें. बुद्धिविकासाला लागणाऱ्या जननमरणादि शक्ति आम्हां मानवांनां अजून माहित नाहींत. पण नागांनां वायुभक्षण करून आपलें मोडकें शरीर नवीन तयार करतां येतें ; सरडांनां रंग पालटतां येतात ; बेडकांनां वैडूर्य मणि ओकून फिरून टाळूंत ठेवतां येतात ; व आम्हां मानवांनांही आमचीं शरीरें आंतून देखील खळबळून धुवून स्वच्छ कपड्यानें पुसतां येतात ; प्रत्येक प्राण्याला भावी कार्याकरतां आज देखील कांहीं अंतर्बाह्य इंद्रियें असतात ; वगैरे ज्ञान आम्हांला असतें ; तर पशूंनां वनस्पतींचें ; व पक्ष्यांनां हवेचें जास्त ज्ञान असतें. सांगायचें इतकेंच कीं, प्रत्येक प्राण्याला आपापलें ज्ञान

व आपापली शक्ति दुसऱ्यास देतां येईल. पण केव्हां ? घेण्याची स्वार्थी बुद्धि टाकून तो देण्याची परमार्थ बुद्धि आचरणीं आणील तेव्हां ! नाहीं तरी इश्वरीयोजनेप्रमाणें त्याच्याकडून रणकंदनांनीं तें कार्य होतेंच आहे ; पण तें कार्य रणकंदनापेक्षां सलोख्यानें व प्रेमानें, कमी खर्चात व जास्त सहजगत्या होईल. होतेंच होतें, हें पति-पत्नींच्या, बाप-लेकांच्या, आई-लेकींच्या, भाऊबहिणींच्या प्रेमानें सिद्ध होतेंच आहे. जें त्यांनां करतां येतें तें राष्ट्रालाही करतां येईल; व तें भिन्न जातीलाही साधेल. म्हणून म्हणतों, सर्व प्राण्यांनीं परस्परांवर निर्हेतुक प्रेमच करावें. आतां प्रेम, दया, माया, स्नेह, इत्यादि सुष्ट भावनांप्रमाणें युद्धप्रियता, क्रौर्य, द्रोह, मत्सर इत्यादि दुष्ट भावनांनीं प्राणी ग्रासलेला असतो हें खरें आहे. पण दुष्ट-भावनांकरतां आपण अन्य ग्रह तूर्त राखून ठेऊं या. माझी तर खात्री आहे कीं, त्यांनांही आपण प्रेमानेंच जिंकूं. पण आज जसें ब्रिटिशांच्या निष्ठुर व जुनाट भेदनीतीपुढें गांधींचें प्रेम अजून टिकाव धरित नाहीं, व अजून जुन्या राजनैतिक पद्धतींचीं भुतें या भूमीवर संचारतात, तसाच प्रकार, अन्य-ग्रहांशीं आपला संबंध आला असतां होणार ! म्हणून तेवढ्याकरतां आपण आपले दुष्ट भाव राखून ठेऊं या. या पृथ्वीवर व पृथ्वीच्या आवरणांत मात्र यापुढें दुष्ट भावनांचीं चक्रें पुन्हःपुन्हां फिरविण्यांत शोभा नाहीं. मानवांनीं आपलेच प्रश्न महत्वाचे समजून, त्यांची प्रगति होणें शक्यच नाहीं. सबब मत्स्यकत्स्यादि मानवांसह प्राण्यांना, तुम्हीआम्हीं सगळे शांतपणें एकत्र होऊन, परस्परांशीं सख्यच करूं या. मत्स्यांनो, तुम्ही तर या पृथ्वीच्या उत्पत्तीचा मूळ सांठाच आहां. पण तुमचा उपयोग कसा करावा, हें आह्मां अक्कलमंद मानवांनां अझून कळेना. आम्ही तुम्हांला खातों तेव्हां आम्ही आम्हांलाच खातों. नरमांसभक्षणापेक्षांही मत्स्यमांसभक्षण हानिकारक असतें. कारण माशांपासून सर्व शरीरधाऱ्यांची उत्पत्ती असते. प्रत्येक प्राण्यांचा गर्भ, आईच्या गर्भाशयांत माशासारखा पोहचलाच पाहिजे. उत्क्रान्ति तत्वानुसार आम्हां मानवांचीं शरीरें अत्युच्च कोटींतली आहेत असें आम्हीं मानव

समजतों. पण मी मघांच सांगितलें आहे कीं, आह्मांला परमेश्वरकृत सृष्टिचा एक कोपराही अजून ठाऊक नाहीं. कवींच्या काव्यकल्पना निखालस खोट्या असें मी कधींही म्हणणार नाहीं. तेंव्हां मत्स्याधिपते! तुमच्या भांडणामुळें आम्ही पशुपक्षीमानवादि हिंस्त्र प्राणी निदान मत्स्यभक्षण तरी विसरलों आहोंत. असें पायरीपायरीनें जरी आपण स्नेहबद्ध होऊं तरी जीवमात्र बराच सुखी होईल, यांत मुळींच संशय नाहीं."



# हुकमेहुकूम

" काय हो! गोपाळराव! झालें समाधान? छापल्या मी माझ्या लघु-कथा? आतां काय ह्मणणें आहे आपलें?" मी गोपाळरावांना, महाराष्ट्र-वाङ्मय मंडळाच्या कचेरींत विचारिलें.

"माझें आतां एकच म्हणणें आहे." गोपाळराव हंसत ह्मणाले; "आतां सीताबाई साळुंके पाहिजे होत्या!"

" ही पहा मी आलेंच!" सीताबाईनीं ड्रॅमॅटिक एन्ट्री करित ह्मटलें; "आपणांस आश्चर्य वाटूं देऊं नका. मी तेव्हांची नाशिकलाच आहे."

"मग आह्मांला सांगितलें कां नाहीं?" मी विचारिलें.

" ही अशी ड्रॅमॅटिक एन्ट्री करण्याकरितां!"

"आपण मोठ्या रॅमन्टिक दिसतां बुवा!"

"असेन कदाचित्! पण मला शिव्हल्री भारी आवडते खरी,"

"मग आह्मीं काय करावें अशी आपली इच्छा आहे?"

"आतां आपलें पुस्तक छापून संपलें. पहिली गोष्ट ही माझ्या विनंतीप्रमाणें झाली; व मला ती आवडली—

"न वाचतांच?"

"वाचली! आतां शेवटलीही माझ्या सांगण्यावरून लिहा; व आतांच्या आतां एथल्या एथें लिहा!"

"हुकमेहुकूम!" मी ऊद्गारलों.

"अगदीं तसेंच केवळ नव्हे. वाटेल त्या विषयावर व वाटेल त्या लांबीची लिहा; पण माझ्या समोर लिहा! आपणांला प्रत्यक्ष लिहितांना मला पहावयाचें आहे." असें ह्मणून त्यांनीं एक टेबलावरचें पॅड् मजपुढें उघडून ठेविलें, व स्वान्-इंकची दौत त्या उघडायला गेल्या; तोंच ती सांडली. त्या विरमल्या; तेव्हां मी त्यांना म्हटलें,

"एकदा अशीच आकाशांत शाई सांडली होती. तेव्हां मी माझी फाउन्टन पेन खालीं धरून ती शाई खालीं जमिनीवर पडूं दिली नाहीं. पण त्यामुळें आपला अपमान झाला असें वाटून ( सीताबाईनीं, मी गोष्ट सांगतों आहे

असें ओळखून पटकन् शॉर्ट हँड् रायटिंग सुरू केलें ; ) देवांनीं एक वीज पाठवून मला उचलून स्वर्गांत नेलें, व मला, शिक्षा म्हणून, देवलोकांतलि लुटारूमध्यें सोडून दिलें. त्या लुटारूंनीं मजकडे पाहिलें; पण मी वेड्याचें सोंग पांघरल्यामुळें त्यांनीं मजकडें पूर्ण दुर्लक्ष करून आपलें संभाषण चालू ठेविलें. तें संभाषण इतकें मोठें होतें कीं, त्याचा सारांश सांगायचा झाला तरी, त्यालाही ७०० पुस्तकें मला लिहावीं लागतील. पण तें संभाषण शेवटीं इतक्या निकरावर आलें कीं, ते एकूण एक लुटारू परस्परांवर लाथाबुक्यांचा यथेच्छ मारा करूं लागले. तरी त्यांचें भागेना ; म्हणून त्यांनीं आपआपलीं भयंकर संहारक अस्त्रेंही सज्ज केलींत. पण त्यांची त्यांनांच काय शरम वाटली कोण जाणे, त्यांनीं शांतपणें विचार करून, मला आपला न्यायाधीश नेमिलें. माझ्या निकालाप्रमाणें चालण्याचें वचन मी प्रत्येकाजवळून घेऊन म्हटलें; ' हें बघा ! तुम्ही सगळे पाश्चात्य ग्रंथकार आहांत. गेल्या अडीच तीन हजार वर्षांत तुम्ही काव्य, शास्त्र, इतिहास, कला, इत्यादि मानवोत्क्रान्तीच्या प्रकारांत हजारों ग्रंथ लिहिले, शोध लाविले, व पराक्रम केले. तेवढ्यावर संतुष्ट न राहतां, प्रत्येकजण आपण स्वतंत्र बुद्धीचें आहोंत, अशी घमेंड मारित आहे ; व त्यापायीं तुम्ही सारे एकमेकांचें रक्तही सांडायला तयार झालां आहांत. आतां मी तुम्हां सर्वांनां सांगतों कीं, तुम्ही सगळे लुटारू आहांत. प्रत्येक जणानें आर्य-संस्कृतीचें एक एक तत्व चोरून घेऊन, जणों जगांत हिंदुस्थान नाहींच, अशा ऐटीनें, त्यावर खूप लिहून ठेविलें आहे. पण तुम्ही एकाही बाबतींत मानवांची प्रगति केली नाहीं;—

' सिद्ध करा!' सगळे ओरडून म्हणाले; नंतर मी एकेकाचें तत्व घेतलें व त्यास आर्यांनीं कोठपर्यंत व कसे विचार व विकास केले आहेत हें सांगितलें तें बेटें त्यांनां पटलें ; पण लुटारूंच तें ! त्यांनां माझा अतिशय राग आला व प्रत्येकानें आपापली लेखणी दौतींत बुडवून मजवर शाईचे डाग शिंपडण्याचा प्रयत्न केला. पण त्या गडबडींत त्यांची ती आकाशांतली दौत सांडली; तसा त्या शाईच्या धारेला धरून, एथें महाराष्ट्रवाङ्मयमंडळाच्या कचेरींत

हा पहा मी आतांच परत आलों. तेव्हां सीताबाई ! आमची ही शाई आपणांकडून सांडली याचें वाईट वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. ही सांडलली शाई जरी कामीं पडली नाहीं, तरी शाई सांडणारीण तर माझ्या कामीं आलीच किनई ! ”

“ निफाडकर! सीताबाईनीं माझ्याकडे विलक्षण मुद्रेनें न्याहाळून म्हटलें” You are certainly not a man of this planct !

” Half right ? I am a citizen of the universe ”

आम्हीं सगळे खूप हसलों. अशा रीतीनें अत्यानदानें हें मानारच आखात

समाप्त.